# धर्मसिंहासन

: लेखक :

वीर वामनराव जोशी



किंमत १॥ रुपया



: प्राप्ति–स्थळ :

बलवन्त पुस्तक भाण्डार,

मुंबई ४

॥ श्रीगजानन प्रसन्न ।

संगीत

# धर्मसिंहासन नाटक.

तिच्या ... र दृष्टीनें ...
— ...चकां... — विनंति आह

९८७०४१

लेखक

वामन गोपाळ जोशी.

राक्षसी महत्त्वाकांक्षा, रणदुंदुभि, शीलसंन्यास, तिलो...,
सुडाचा संदेश इ० नाटकांचे कर्ते

व

" स्वतंत्र हिंदुस्थान " पत्राचे संपादक.
अमरावती, वऱ्हाड

---

आवृत्ति १ ली.

---

जुलै १९२९.

---

किंमत १॥ रु.

# प्रस्तावना.



संगीत **रणदुंदुभी**नंतर दोन अडीच वर्षांनीं माझें हें तिसरें संगीत नाटक आज प्रसिद्ध होत आहे. **रणदुंदुभी**प्रमाणें या नाटकांतील प्रतिपाद्य विषय, आणि त्याच्या प्रतिपादनार्थ योजलेलें कथानक अगदीं सरळ व स्पष्ट असल्या-कारणानें त्याची येथें विशेष चर्चा करण्याचें प्रयोजन नाहीं. पूर्वीच्या दोन कृतीं-प्रमाणें ही कृतिही दोषपूर्णच असल्यामुळें तिच्याकडे न्यायनिष्ठुर दृष्टीनें न पाहतां सहानुभूतिपूर्ण दृष्टीनें पहावें अशी सहृदय वाचकांना माझी नम्र विनंति आहे.

## आभार.

हें नाटक जन्मास येण्यास मुख्यत्वेंकरून माझे मेव्हणे श्री. **बाळाजी जनार्दन ऊर्फ बाबा काका अभ्यंकर** मुंबई व माझे मित्र रा. **नरहर विठ्ठल भावे** मुंबई यांचा प्रेमाग्रह कारणीभूत झालेला असल्यामुळें प्रथम या उभयतां मित्रांचे आभार मानल्यावांचून मला इतर साह्यकारी मित्रमंडळींच्याकडे वळतां येत नाहीं.

संगीत **रणदुंदुभी**प्रमाणें हें नाटक लिहिण्याच्या कामींही माझे भाचे रा. **नारायणराव** ऊर्फ **नाना अभ्यंकर** यांनीं मला जें अमोल सहाय्य केलें त्याबद्दल त्यांचें आभार मानावेत तेवढे थोडेंच आहेत. त्याचप्रमाणें नवीन व सुरस चाली देऊन नाटकांतील पद्यभाग नीटनेटका करण्याच्या कामीं नाट्य-कलाप्रसारक संगीत मंडळींतील प्रसिद्ध नटी **श्रीमती कमलाबाई कामत** यांनीं जे श्रम घेतले त्याबद्दल त्यांचेहि अंतःकरणपूर्वक आभार मानणें अवश्य आहे.

नाट्यकलाप्रसारक संगीत नाटक मंडळीचे मालक श्री. **गणपतराव** व **गोविंदराव लेले** यांनीं हें नाटक आपल्या मंडळीकडून अत्यंत परिश्रमपूर्वक बसवून रंगभूमीवर आणलें याबद्दल त्यांचे आणि त्यांच्या नटवर्गाचे व इतर मदतगार मंडळींचे मी मनःपूर्वक आभार मानतों व त्यांनीं केलेल्या श्रमांचें पूर्ण सार्थक होवो असें इच्छितों.

रंगभूमीची सजावट उत्तम प्रकारें केल्याबद्दल पुण्याचे प्रसिद्ध पेन्टर रा. **देशमुख**, कंपनीचे पेन्टर रा. **दांडेकर** आणि अमरावती येथील तरुण होतकरू पेन्टर रा. **कळसकर** व रा. **गंगात्रे** हेही आभारास पात्र आहेत.

पद्यभागासाठीं कांहीं निवडक चाली देऊन शिवाय नाटक मंडळींतील गाणाऱ्या पात्रांना मेहनतीनें शिकवून तयार केल्याबद्दल येथील सुप्रसिद्ध गवई **नथुबोवा तावडे कै० नामदेवबोवा** यांचे पट्ट शिष्य–यांचाही मी फार आभारी आहे.

पुस्तकांतील सुंदर छायाचित्रें उत्तम प्रकारें तयार केल्याबद्दल येथील प्रसिद्ध फोटो काढणार आर्टिस्ट श्री. **डी. वाय. बेनकर** यांचे व चित्रांचे ब्लॉक्स करून तीं छापून देण्याबद्दल आणि एकंदर पुस्तक अल्पावधींत छापून तयार करण्याबद्दल पुणें येथील चित्रशाळा छापखान्याचे म्यानेजर रा. **शंकर नरहर जोशी** यांचाही ऋणी आहे.

याशिवाय नाटक लिहितांना व नाटकाच्या तालमी चालू असतांना वारंवार उपयुक्त सूचना करून ज्या माझ्या रसिक व विद्वान् मित्रांनीं मला सहाय्य केलें यांचेही मी अंतःकरणपूर्वक आभार मानितों.

अमरावती, वऱ्हाड
मंगळवार ता. २३-७-१९२९

**वामन गोपाळ जोशी.**
ग्रंथकर्ता.



॥ श्रीगजानन प्रसन्न ॥

संगीत

# धर्मसिंहासन नाटक.



## मंगलाचरण.

पदः—केदार-तेवरा. शरन करतु गोविंद०—

पतितजन-आनंद-कुवलय ॥ धर्म-पदरज चिर-निरामय ॥

करुं तयासी प्रणति सविनय ॥ ध्रु० ॥

अबलजन-भय-तम निवारुनि ॥

प्रबल खल-बल-ताप वारुनि ॥

नीति-नय-साम्राज्य पसरुनि ॥

अवनितल करि शांति-सुखमय ॥ १ ॥



## अंक १ ला.



### प्रवेश १ ला.



[ कैरव महासभामंदिर—**कामलता, कल्पलता, सुरेंद्र, खगेंद्र, मृगेंद्र, भुजंग,** इत्यादि ].

**कल्प०**—( कामलता रागानें निघून जात असतां तिचा हात धरून ) ताई, थांब. थोडी उभी रहा. मला तुझ्याशीं दोन शब्द बोलावयाचे आहेत.

**काम०**—( रागानें ) सोड-सोड-माझा हात. मला आतां इथें क्षणभरही थांबावयाचें नाहीं. तुझ्याशीं एक अक्षरही बोलावयाचें नाहीं. तेव्हां दूर हो-मला अडवूं नकोस.-मुकाट्यानें मला आपल्या वाटेनें जाऊं दे.

( हात हिसकावून घेते. )

**कल्प०**—ताई, निवडणुकींत माझा विजय झाल्यामुळें या कैरव राजसिंहासनाचें स्वामित्व आतां माझ्याकडे येणार असलें, तरी तुझ्या सुखांत–तुझ्या सन्मानांत–तुझ्या वैभवांत काडीइतकीही कमतरता मी पडूं देणार नाहीं, ही तुझी खात्री असूं दे.

**काम०**—सत्तेवांचून सुखाला आणि सन्मानाला घेऊन काय चाटावयाचें आहे ? सत्ता नाहीं तेथें वैभव नाहीं आणि वैभव नाहीं तेथें सुखसन्मानाची आशा करणें व्यर्थ आहे.

पद—सदा प्रणया विलासिनी०—

**वृथा सुख-लाभ-लालसा ॥ प्रभुता नुरतां विषयपिपासा ॥ घडवि निराशा-नरक-वासा ॥ ध्रु० ॥ प्रीति सतत मलिना मानसा ॥ मानरहित मृत विलासीं ॥ मानधना ललना न सेवी ॥ या विष-रसा ॥ १ ॥**

**कल्प०**—पण सत्तेनें आज तुला झिडकारलें असलें तरी ती तुझ्यावर सदैव अशीच अप्रसन्न राहील, असें तूं कां समजतेस ? प्रयत्न करशील तर राजसिंहासनाचा मार्ग अजूनही खात्रीनें तुला खुला होईल–नव्हे–मी स्वतः तो तुला आपल्या हातानें खुला करून देईन. मला कांहीं राज्याचा लोभ नाहीं–वैभवाची हौस नाहीं.—

**काम०**—पुरे कर तुझें हें वैराग्याचें ढोंग ! तुझे सारे कांगावे मला चांगले कळतात.–म्हणे राज्याचा मला लोभ नाहीं–वैभवाची हौस नाहीं ! अहाहा ! केवढी पण वैराग्याची पुतळी तू ! जसा कांहीं भगवान् बुद्धच तुझ्या रूपानें या युगांत भूतलावर अवतरला आहे ! अग, तुला जर खरोखरच राज्याचा लोभ नसता, वैभवाची हौस नसती, तर तूं माझ्याशीं स्पर्धा करण्याला मुळीं उभीच राहिली नसतीस.

**कल्प०**—आणि खरें म्हणशील तर मी आपण होऊन उभी राहिलेंही नाहीं. बाबांची इच्छा व लोकांचा आग्रह म्हणून माझा अगदीं निरूपाय झाला.

**काम०**—वाहवा–वाहवा ! काय पण साळसूदपणाचा आव आणतें आहेस ! म्हणे बाबांची इच्छा–लोकांचा आग्रह ! काय गे, बाबांनीं विषाचा पेला तुझ्या घशांत कोंबला असता तर तो तूं मुकाट्यानें गिळला असतास का ? अथवा लोकांनीं तुला विहिरींत जीव देण्याचा आग्रह केला असता, तर तो तूं बिनतक्रार दिला असतास का ? बोल–दे जबाब ? आतां कां दांताखिळी बसली ?

**कल्प०**—दांतखिळी कशाला बसेल? पण तुला माझा एक शब्दही खरा वाटत नाहीं तर मी बोलणार तरी काय?

**काम०**—पण बोलली नाहींस तरी मला तुझे अंदरचे कावे दावे कळत नाहींत असें तूं समजूं नकोस. सुरेंद्रांनीं तुझ्या प्रेमाचा धिःकार करून माझ्या प्रेमाचा स्वीकार केल्यामुळें तुझ्या जिवाचा जळफळाट झाला आहे व माझ्यावर सूड उगविण्यासाठीं तुझा जीव सारखा तडफडत आहे हें मी पुरें जाणून आहें.

**कल्प०**—ताई, तुला काय वाटेल तें तूं म्हण. पण परमेश्वरसाक्ष मी तुला सांगतें कीं, तुझ्यासंबंधानें माझ्या मनांत यत्किंचितही विपरीत भाव नाहीं. सुरेंद्रांनीं माझा अव्हेर करून तुझा स्वीकार केला, याबद्दल मला उलट समाधानच वाटत आहे. आणि परमेश्वरानें तुम्हां उभयतांना सदासर्वकाल सुखांत ठेवावें अशीच माझी त्याच्या चरणापाशीं प्रार्थना आहे.

**काम०**—मायावी माणसें बोलतांना नेहेमीं असेंच लाघव दाखवीत असतात. पण करणीची वेळ आली कीं, आपला डाव उगविण्यास: कधींही मागेंपुढें पहात नाहींत. आणि आतां तर तूं राणी झाली आहेस व सुडाचीं सर्व साधनें तुझ्या हातांत आलीं आहेत. तेव्हां आतां यापुढें तर मला तुझ्याशीं फारच जपून वागलें पाहिजे. नाहींतर गोड शब्दांच्या जाळ्यांत फसवून तूं केव्हां कशी माझी मान कापशील याचा कांहीं नेम नाहीं.

**कल्प०**—ताई, माझ्या संबंधानें तूं हा आपला निष्कारण गैरसमज करून घेतला आहेस. मी राणी झाल्यें अगर महाराणी झाल्यें तरी तुझें वडिलकीचें नातें मी आजन्म विसरणार नाहीं आणि तुझी कधींही अवज्ञा करणार नाहीं. तेव्हां निष्कारण संताप करून घेऊन असा त्रागा करूं नकोस. या जगांत तुझ्यावांचून मला मायेचें असें कोण आहे? तूंच माझी बहीण–तूंच माझा भाऊ;–तूंच माझी आई–तूंच माझा बाप;–तूंच माझा गुरु–तूंच माझा देव—

**पद**—यमन–त्रिताल. यलतियाल०

**व्यसनकालिं मज कवण वालि जागिं या ॥ तुजविण माउली सदया ॥ धृ० ॥ मी अबला । अनाथा बाला ॥ कारिं धारि । असुखकारि । भय वारि । तारि भव ॥ १ ॥**

**काम०**—बस्. पुरे कर तुझें हें चऱ्हाट! पहिल्यानें गळ्याला फांस लावायचा आणि मागाहून मढ्याला शृंगार चढवायचा! म्हणे मीच आई–मीच बाप!

करावयाचें काय तुझ्यासारखीचे आईबाप होऊन ? तुझ्यासारख्या भोंदूचा देव –आणि लफंग्यांचा गुरु होण्यापेक्षां कुंभाराचें गाढव होणें मी पत्करीन ! बोलणीं मानभावाचीं आणि करणी कसाबाची ! बस्. यापुढें मी तुझी बहीण नाहीं–आप्त नाहीं–इष्ट नाहीं–आणि तुझ्याशीं कोणत्याही प्रकारचा मित्रत्वाचा संबंध ठेवायला मी साफ तयार नाहीं. मला घोडा पाहिजे आहे, गोमाशी नको आहे !

**कल्प०**—ताई, हें राज्य तुला अर्पण करण्याचें जर माझ्या स्वाधीन असतें तर तें या क्षणीं तुझ्या पायांवर वाहून मी तुझी समजूत काढली असती ! पण काय करूं ? त्या बाबतींत मी अगदीं परतंत्र आहें.

**काम०**—परतंत्र आहेस ? कशी परतंत्र आहेस ? मला हें राज्य नको; तें कामलतेलाच मिळालें पाहिजे, असं जर तूं लोकांना निक्षून सांगितलें असतेंस तर मला सिंहासनावर चढूं न देण्याची लोकांची काय छाती होती ?

**कल्प०**—असें सांगण्यास मी केव्हांही तयार होतें व आहें. इतकेंच नव्हे तर तूं म्हणतेस त्याच शब्दांत ही गोष्ट मी लोकांना स्पष्ट सांगितलीही होती. पण ते आपला हट्ट सोडायला तयार झाले नाहींत, त्याला मी काय करणार ?

**काम०**—तूं काय करणार ? ठीक आहे. ते तयार झाले नाहींत तर ते तयार होतील असाच चमत्कार मी करून दाखवीन. न्यायानें हें राज्य माझें आहे; आणि तें वाटेल त्या चोराच्या हवालीं करण्याचा बावांना किंवा लोकांना काडीचाही अखत्यार नाहीं. निवडणुकीचें थोतांड उभें करून तुम्ही सर्वांनीं माझी फसवणूक केली आहे. पण मी नांवाची कामलता असेन तर तुमचे सर्वांचे दांत तुमच्या घशांत घातल्यावांचून कधींही सोडणार नाहीं.

**कल्प०**—ताई, नको–नको—असा आततायीपणा करून आपला अधःपात करून घेऊं नकोस. लोकनिर्णयाला मान देण्याचें तूं कबूल केलें आहेस आणि आपला शब्द पाळणें, हें तुझें कर्तव्य आहे.

**काम०**—लोकांनीं प्रामाणिकपणा दाखविला असता तर मीही आपल्या कर्तव्याला जागलें असतें. पण लोक माझ्याशीं बेमान झाले. माझा जन्मसिद्ध हक्क त्यांनीं धुडकावून लावला. तेव्हां मला आतां त्यांची पर्वा करण्याचें कारण काय ? त्यांना मी नको–माझा त्यांना हेवा वाटतो–तिरस्कार वाटतो ! पण लक्षांत ठेवा म्हणावें, एक दिवस असा उगवेल कीं जेव्हां त्यांना नाक घाशीत माझ्या पायावर लोटांगणें घालीत यावें लागेल ! बस्. यापुढें तुझें हें काळें

तोंड पहाण्याची माझी बिलकुल इच्छा नाहीं. जा-जा—ज्यांनीं तुला डोक्यावर घेऊन नाचावायला सुरुवात केला आहे, त्यांच्याकडे जा. तेच यापुढें तुझे आप्तइष्ट-तुझे सगेसोयरे आहेत; मी तुझी कोणी नाहीं ! जा—तुझ्यासारख्या खलदुर्जनाकरितां, दया आणि प्रेम, हीं देवानें निर्माण केलेलीं नाहींत.—

पद-मयवपुघट०—.

**सत्याहिंसक सत्ता-प्रमत्ता सदयता ॥ वितरि हतबुद्ध तरि करी आत्मघाता ॥ धृ० ॥ सुरस पयोरस कालभुजंगा ॥ कदा कालिं गत-गरल करिल कां ? ॥ १ ॥**

( कामलता जाते मागून भुजंगादि जातात. )

**मृगेंद्र**—छे-छे-छे-असली हटवादी माथेफिरू बायको आपण जन्मांत कधीं पाहिली नाहीं.

**खगेंद्र**—खरोखर, ही अकाळवीज जर राज्यावर कोसळली असती, तर लोकांचा भोगच ओढवला असता.

**मृगेंद्र**—(पाहून) सुरेंद्र येत आहेत वाटतें. (सुरेंद्र कांहीं अनुयायांसह प्र. क.)

**सुरेंद्र**—राणी कल्पलतेचा विजय असो !

**कल्प०**—राणी कल्पलतेचा विजय ! आणि तो सुरेंद्राच्या मुखानें ?

**सुरेंद्र**—कां ? सुरेंद्राच्या मुखानें राणी कल्पलतेचा विजय होऊं नये, असें आपल्याला वाटतें कां ?

**कल्प०**—असें कसें वाटेल ? माझा अव्हेर करून कामलतेचा ज्यांनीं अंगिकार केला व मला कैरवांचें राणीपद प्राप्त न होतां तें कामलतेच्या पदरांत पडावें म्हणून ज्यांनीं मला हाणून पाडण्यासाठीं आपली शिकस्त केली, त्यांनीं आपला पराजय कबूल करून ‘ राणी ’ या उपपदानें माझा गौरव केला तर त्यांत मला केव्हांही आनंदच वाटणार ! परंतु असा प्रसंग इतक्या लौकर येईल, अशी मात्र माझी कल्पना नव्हती.

**सुरेंद्र**—आपली तशी कल्पना नसणें साहाजिक आहे. पण माझ्या मतें झाला हाच विलंब झाला. वास्तविक निवडणुकीचा निकाल जाहीर होतांच मी आपलें अभिनंदन करावयास पाहिजे होतें. आपण कांहीं एकमेकांचे जन्माचे हाडवैरी नव्हतों. आपलें शत्रुत्व केवळ तात्पुरतें होतें. तेव्हां तें संपतांच परस्परांनीं परस्परांचा प्रेमादरपूर्वक सत्कार करणें हेंच आपलें कर्तव्य होतें व अजूनही आहे.

कल्प०—सुरेंद्र, मी आपली फार आभारी आहे. आपल्याप्रमाणें कामलतेनेंही जर एवढा उदारपणा दाखविला असता तर माझ्या आनंदाला पारावार राहिला नसता.

सुरेंद्र—राणीसाहेबांनीं निराश होण्याचें कांहीं कारण नाहीं. रागाची पहिली उसळी ओसरून गेल्यावर कामलताही आपलें प्रेमानें स्वागत करील, अशी माझी खात्री आहे.

खगेंद्र—आपली खात्री असेल, पण आम्हांला खात्री वाटत नाहीं. लोकनिर्णयाला पायाखालीं तुडवून मी कैरव; राजसिंहासन पादाक्रान्त करीन, अशी ताईसाहेबांनीं नुकतीच प्रतिज्ञा केली आहे.

सुरेंद्र—अविचाराच्या भरांत केलेल्या प्रतिज्ञा विचारांतीं बदलत नाहींत, असें थोडेंच आहे ?

कल्प०—पण आपण केला तो अविचार केला, एवढें तरी प्रथम कळलें पाहिजे ना ?

सुरेंद्र—डोकें शांत झाल्यावर तें आपोआप कळेल.

मृगेंद्र—पण डोकें असेल तर तें शांत होणार ना ?

सुरेंद्र—( रागानें ) मला वाटतें आपण हा लहान तोंडीं मोठा घांस घेत आहांत. कामलतेच्या डोक्याची चर्चा—आणि ती राणीसाहेबांच्या पुढें तुम्ही करणें हें मर्यादेचें उल्लंघन आहे.

कल्प०—सुरेंद्र, तें राहूं द्या. कामलता शांत होवो वा न होवो, त्याची मला इतकीशी फिकीर वाटत नाहीं. मला आपल्या सहानुभूतीची आणि सहाय्याची अधिक अपेक्षा आहे. कारण—

पद—लोटिसी कासया०

**कालही बालसा ॥ शिरीं जरि वरद कर आपुला दासा ॥ध्रु०॥**
**सेवितां या पदां ॥ सकलही तापदा आपदा निरसुनी ।**
**होत सफल शुभ—काल-लालसा ॥ १ ॥**

सुरेंद्र—राणीसाहेब, माझा स्नेह अभंग आहे—माझा शब्द वज्रलेप आहे.

पद—बिहाग—त्रिवट. फुकट का गर्जना०

**नच वृथा वल्गना ॥ ही; वाया अभय-वचन कधिं ॥ शील निरत नर न वदति । येई मरण जरि अवचितिं ॥ ध्रु० ॥ वचन**



सुरेंद्र:—ही तलवार आपल्या पायांवर वहातों. (पृ० ७)

[ फोटो काढणार—डी. वाय्. बेनकर, आर्टिस्ट अमरावती. ] (अंक १ ला, प्र. १ ला).

**भंग अति अघोर पातक। मदोन्माद-भरें आचरितां॥ कुल-सुयश लांछवुनि ॥ घडवित अधमाधमा निरयगति ॥ १ ॥**

**कल्प०**—सुरेंद्र, हें तुमचें आश्वासन अखेरपर्यंत कायम टिकेल ना ?

**सुरेंद्र**—टिकलेंच पाहिजे. लोकनिर्णयाला मान देण्याची मी थोरल्या महाराजांच्या पायाशीं शपथ केली आहे.

**खगेंद्र**—तशी शपथ ताईसाहेबांनींहीं केली आहे. पण त्या ती पाळण्यास आतां तयार नाहींत.

**सुरेंद्र**—तयार नसून उपयोग काय ? ती तिला पाळावीच लागेल.

**कल्प०**—पण तिनें ती पाळली नाहीं तर ?

**सुरेंद्र**—मी तिला ती पाळावयाला लावीन.

**मृगेंद्र**—आपलाही शब्द त्यांनीं मानला नाहीं तर ?

**सुरेंद्र**—तर-तर ही तलवार तिला तिच्या प्रतिज्ञाभंगाच्या पातकाबद्दल प्रायश्चित्त घडविल्यावांचून रहाणार नाहीं.

**कल्प०**—सुरेंद्र, प्रेमापुढें तलवारीचा अखेरपर्यंत टिकाव लागणार नाहीं.

**सुरेंद्र**—राणीसाहेब, प्रेमरसांत विरघळून जाणारी तरवार विकारवश असते. पण या सुरेंद्राची तरवार विचारवश आहे. ती कर्तव्यपालनावांचून बाहेर पडत नाहीं. आणि कर्तव्यपालनासाठीं एकदां बाहेर पडल्यावर कर्तव्यसमाप्तीवांचून पुनः म्यानांत परत जात नाहीं.

**कल्प०**—तर मग वहा ती तरवार माझ्या पायावर आणि करा माझ्या रक्षणाची शपथ.

**सुरेंद्र**—ही घ्या-आपल्या संरक्षणाप्रीत्यर्थ मी ही तरवार आपल्या पायांवर अर्पण करितों आणि परमेश्वराच्या साक्षीनें आपल्या रक्षणाची शपथ करतों.

( तसें करतो ).

**कल्प०**—सुरेंद्र, आपल्या या उदार कृतीनें आपण मला जन्माचे ऋणी केलें आहे. जा-आणि तुमच्यांत असेल नसेल तेवढें सामर्थ्य खर्च करून कामलतेची समजूत घाला. माझ्यामुळें कैरवांवर यादवीची आपत्ति कोसळूं नये, अशी माझी इच्छा आहे.

**सुरेंद्र**—सरकारांनीं अगदीं निश्चिंत असावें. परमेश्वराच्या कृपेनें भलताच प्रसंग ओढवणार नाहीं. कामलतेला माझ्या प्रेमाची कांहीं किंमत असेल आणि

मी तिचें पाणिग्रहण करावें या तिच्या इच्छेंत कांहीं सत्यांश असेल तर तिला माझ्या पावलावर पाऊल टाकूनच चालावें लागेल-अन्य मार्गानें चालतां येणार नाहीं.

**कल्प०**—परमेश्वर तुमची वाणी खरी करो !

**सुरेंद्र**—सरकारांचा विजय असो ! ( अनुयायांसह जातो. )

**कल्प०**—आतां माझा जीव खालीं पडला !

**मृगेंद्र**—खालीं कसला पडला ? हा प्रेमाचा प्रयोग अद्यापि यशस्वी व्हावयाचा आहे.

**कल्प०**—पण तो यशस्वी होणार अशी माझी आतां पक्की खात्री आहे. मृगेंद्र, प्रेमाचें सामर्थ्य किती अगाध आहे, याची तुम्हाला कल्पना नाहीं.

पद—पाणिदानिं प्रेरणा करी०—

**विमल थोर प्रेम-भाव हा। संसारा थारा ॥ कलह-कालिं व्यसन-जालिं। होत सतत विजयशालि ॥ धृ० ॥ वैरभाव जिंकुनिया ॥ किंकरसा अंकित करि ॥ स्नेहपाशिं। हितविनाशि। पापराशि। खल महाहि ॥ १ ॥**

[ जातात.

---

## प्रवेश २ रा.



**स्थळः**—कामलतेचा महाल.

**[ कामलता व भुजंग ].**

**काम०**—काय ? उद्दामकेतूला-कांतारसम्राट उद्दामकेतूला-तुम्ही वश करून घ्याल ?

**भु०**—होय-होय-उद्दामकेतूला-कांतारसम्राट उद्दामकेतूला-आपल्या घराण्याच्या शत्रूला-आपल्या देशाच्या दुस्मानालासुद्धां आपल्या मी घरीं कावडी वहावयाला लावीन कावडी.

**काम०**—शक्य नाहीं-बिलकुल शक्य नाहीं.

**भु०**—कां ? कां शक्य नाहीं ? उद्दामकेतू म्हणजे कांहीं कोणी बडा सैतान नाहीं.

**काम०**—वडा सैतान नाहीं. पण त्याचें व आमचें पिढ्यानुपिढ्यांचें हाडवैर आहे.

**भु०**—पण पिढ्यानुपिढ्यांचें हाडवैर म्हणजे कांहीं हिमालय पर्वत नाहीं; आणि राजकारणांत तर असले हिमालय हरघडीला उगवतात आणि हरघडीला मावळतात !

**काम०**—त्यानें बाबांच्या जवळ माझी मागणी केली होती आणि बाबांनीं ती माझ्या आग्रहावरून नाकारून त्याचा अपमान केला होता.

**भु०**—तें सर्व मला माहीत आहे. त्याची फिकीर नको आपल्याला. आपण उद्दामकेतूची मदत स्वीकारण्याला तयार आहांत का, एवढें सांगा. म्हणजे पिढ्यानुपिढ्यांचें हाडवैर सुद्धां एका फुंकाराबरोबर कसें उडवून देतां येतें, तें मी तत्काल आपल्या प्रत्ययाला आणून देतों.

**काम०**—उद्दामकेतूच्या फंदांत पडावयाचें म्हणजे जिवाला धोका वाटतो.

**भु०**—धोका वाटतो ? काय धोका वाटतो ?

**काम०**—तो कल्पलतेबरोबर मलाही एकाद्या दिवशीं अलगत उचलून तोंडांत टाकण्यास मागेंपुढें पहाणार नाहीं.

**भुजंग**—हां ! सैतान जागवावयाचा म्हणजे दुस्मानाबरोबर आपल्याही जिवाचा बळी तयार ठेवावाच लागतो. लोकांना अपशकून करावयाचा असेल तर स्वतःचें नाक–निदान नाकाचा शेंडा तरी कापून घेतलाच पाहिजे. हां–घेतलाच पाहिजे ! युद्धांत आणि राजकारणांत आपली चिता रचूनच शत्रूच्या पिंडदानाचें उदक सोडीत असतात. तेव्हां अशा सट्टेबाजीच्या सौद्यांत पावलागणिक शंका काढीत बसल्यास निश्चयाला सात जन्म देखील पुरावयाचे नाहींत. कोणत्या तरी धोक्यांत केव्हां तरी उडी ही घेतलीच पाहिजे. राजकारण म्हणजे कांहीं नाजुक पुष्पशय्या नाहीं. हें कांट्यागोट्यांनीं गजबजलेलें खडतर मैदान आहे. इथें दमडीवांचून चमडी नाहीं आणि चमडीवांचून दमडी नाहीं.

**काम०**—पण परकीयांच्या सहाय्यानें स्वकीयांचा नाश करणें हें पाप नाहीं कां ?

**भुजंग**—पाप ? मुळींच नाहीं–बिलकुल नाहीं–अजिबात नाहीं. उलट आपल्या मानेवर सुरी चालविणाऱ्या कसाबांना आप्त आणि स्वकीय लेखणें हें

पाप आहे. शिवाय आडवेंच येऊं लागलें तर पोटचें पोर सुद्धां कापून काढावें लागतें. मग इतरांची काय कथा ?

**काम०**—मला वाटतें, सुरेंद्रांचा या बाबतींत काय अभिप्राय पडतो तें पाहून मग पुढें काय करावयाचें तें ठरविणें चांगलें.

**भुजंग**—सुरेंद्राचें मत आणि तें या बाबतींत ? छे, तें शक्य नाहीं. सुरेंद्राला या रहस्यांत घ्यावयाचें असेल तर या दासाची चाकरी या क्षणापासून संपली असें समजा. सुरेंद्र असेल तेथें भुजंग पाऊल टाकणार नाहीं आणि भुजंग असेल तेथें सुरेंद्राचें पाऊल तो पडूं देणार नाहीं.

**काम०**—अहो असें एकदम उसळतां काय ?

**भुजंग**—एकदम उसळतां काय ? सरकार, या कारस्थानाचा नुसता वास सुरेंद्राला लागला तर तो माझीं पाळेंमुळें खणून काढील, सोडणार नाहीं. आपल्यासारख्या थोरांना शंभर खून माफ होताल. पण आमच्यासारख्या गरिबांना मुंगी पायाखालीं चिरडली तरी ताबडतोब फांसावर चढण्याची पाळी येईल ! ठाऊक आहे आपल्याला ? बस्. आतां यापुढें या बाबतींत एक शब्द तोंडांतून निघाला तर तत्काल जीभ छाटून घेईन.

**काम०**—हो-हो-हो-जरा आस्ते—जरा सबूर—

**भुजंग**—नको-नको. मला गरिबाला शंभर वर्षांचें आयुष्य देवानें घातलें नसलें तरी मरेपर्यंत जगण्याची मुभा दिली आहे. तेव्हां मरणाच्या आधींच मरण्याची पाळी मज गरिबावर आणूं नका.

**काम०**—राहिलें. तुमची इच्छा नाहीं तर मी ही गोष्ट सुरेंद्रांच्या जवळ काढीत नाहीं, झालें ? पण साधारण त्यांचा कल कसा काय आहे हें पडताळून पहाण्याला तर तुमची कांहीं हरकत नाहीं ना ?

**भुजंग**—पुनः आपलें तेंच ! पहिले पाढे पढे पंचावन ! कल पडताळून काय पहावयाचा ? अहो, कल्पलतेची सत्ता मान्य करण्यास ते तयार आहेत, हें त्यांनीं आपणास कालच स्पष्ट सांगून टाकलें नाहीं का ?

**काम०**—काल सांगितलें असलें तरी माझ्या रागाचा कांहीं तरी परिणाम आज त्यांच्यावर झाला असेल.

**भुजंग**—शक्य नाहीं. आपल्या रागाची अगर लोभाची त्यांना आतां काडीइतकीही कदर नाहीं. आजवर सारख्या ठोंकरा बसत आल्या तरी त्यांच्या

अंतरंगाची आपल्याला अजून ओळख पटली नाहीं म्हणजे काय म्हणावें ? सरकार, बोलतों याची माफी असावी. पण मी आपणाला छातीवर हात ठेवून सांगतों कीं, सुरेंद्र पूर्वीही आपला नव्हता, आतांही आपला नाहीं आणि पुढेंही खास आपला रहाणार नाहीं. त्याचें जीवनसर्वस्व आतां कल्पलतेनें–हां–कल्पलतेनें व्यापून टाकलें आहे, आणि यापुढें तो तिच्यांतच सर्वस्वी विलीन होऊन जाणार आहे. आहांत कोठें ? आपला आणि त्याचा ऋणानुबंध आतां संपला.

**काम०**—अशक्य–अगदीं अशक्य. कल्पलतेच्या प्रेमाचा सुरेंद्रांनीं माझ्या-समोर धिःकार केला आहे, तेव्हां ते फिरून तिच्या पाशांत आपली मान अडक-वून घेतील, ही गोष्ट अगदीं अशक्य आहे.

**भुजंग**—ताईसाहेब, आपला स्वभाव खरोखरच अगदीं भोळा आहे. आपल्याला मतलबी पुरुषांचे कपटी लपंडाव बिलकुल कळत नाहींत. दोहों-घरच्या पाहुणचारावर हात मारावयाचा असला म्हणजे आम्ही पुरुष असेच हातचलाखीचे खेळ खेळत असतों. वरून पक्ष एकाचा आणि आंतून मदत दुसऱ्याला, हें तर आमचें नेहेमींचेंच व्रत आहे. नाहींतर सुरेंद्रासारखा लोकप्रिय व लोकमान्य लोकनायक आपल्या बाजूनें उभा असतां कल्पलता एवढ्या प्रचंड बहुमतानें राणी निवडलीच गेली नसती, हें मी आपल्याला खात्रीनें सांगतों.

**काम०**—तुम्हांला त्यांच्या मोठेपणाचा हेवा वाटतो–मत्सर वाटतो आणि म्हणून त्यांची नालस्ती करून माझें मन त्यांच्याविषयीं कलुषित करण्याचा हा तुम्ही दुष्ट उद्योग चालविला आहे. पण मी तुम्हाला बजावून ठेवतें कीं—

**भुजंग**—पुरें. कळलें सारें मला. हातच्या कांकणाला आरसा कशाला पाहिजे ? हा सूर्य आणि तो जयद्रथ. ते पहा सुरेंद्रच इकडे येत आहेत. तेव्हां आपल्या रागालोभांना ते काय किंमत देतात, याचा आतांच पडताळा लावून घ्या. आपल्या म्हणण्याप्रमाणें आपल्या रागाला भिऊन त्यांचा कालचा विचार आज पालटला असेल तर मी आपले शब्द परत घेऊन जिवंतपणीं आपली गर्दन उतरून देईन.

**काम०**—ठीक आहे. आतांच एक घाव आणि दोन तुकडे करून टाकतें. माझी समजूत खोटी ठरून तुमचें म्हणणें खरें ठरलें तर मी त्यांचें तोंड पहाणार नाहीं आणि माझें तोंड त्यांना दाखविणार नाहीं. ( सुरेंद्र येतो ). सुरेंद्र, काय विचार ठरला ?

**सुरेंद्र**—कालचाच निश्चय कायम झाला.

**भु०**—म्हणजे ? कल्पलतेची सत्ता तुम्ही अखेर मान्य करणार ?

**सुरेंद्र**—होय. ती मला मान्य केलीच पाहिजे; आणि ती मी करणारच.

**भु०**—आं ? मान्य केलीच पाहिजे; आणि करणारच ? वा ! उत्तम-उत्तम फारच उत्तम ! ऐका-ऐका-

**काम०**—सुरेंद्र-सुरेंद्र, काय केलेंत हें ? तुम्हाला माझा हा असा केंसानें गळा कापावयाचा होता तर मला पहिल्यानेंच तसें स्पष्ट कां सांगितलें नाहींत ? म्हणजे मी या फंदांत पडलच नसतें. आतां ना प्रपंच ना परमार्थ, अशी माझी दुहेरी नागवण झाली आहे. राज्यापरी राज्य गेलें आणि वर जगांत छीः थू झाली ! आतां मी काय करणार ?

**भु०**—दुसरें काय करावयाचें ? सुरेंद्रांच्या प्रमाणें शरणागति पत्करून कल्पलतेच्या पायावर साष्टांग लोटांगण घालावयाचें-हां-आणि ' क्षमस्व परमेश्वरी, ' म्हणून दीनवाणीनें तिची करुणा भाकावयाची !

**सुरेंद्र**—आणि खरें म्हणशील तर हाच मार्ग आज आपल्या हिताचा आहे. दांडगाईनें फायदा तर कांहीं व्हावयाचा नाहींच पण हकनाक सर्वस्वाला मुकण्याची मात्र पाळी येईल.

**काम०**—प्राण गेला तरी बेहेत्तर. पण शरणागति पत्करून कल्पलतेच्या पायाची धूळ मस्तकावर वागविण्यास मी कदापि तयार होणार नाहीं.

**सुरेंद्र**—हा शुद्ध अविचार आहे. अशानें राज्य मिळण्याची थोडीशी आशा आहे, तीही नाहींशी होईल. लोक आधींच तुझ्यावर बिथरलेले आहेत आणि त्यांत तूं अशी दुराग्रहाला पेटून भलतीकडेच वहावलीस तर ते तुझे कायमचे शत्रु होऊन बसतील. आणि मग कैरव-राजसिंहासनाकडे नुसती नजर वळविणें सुद्धां तुला शक्य होणार नाहीं.

**काम०**—पर्वा नाहीं. भीक म्हणून हें राज्य मला लोकांकडून नकोच आहे. राज्य माझें आहे आणि लोकांची इच्छा असो वा नसो, तें मला मिळालेंच पाहिजे.

**सुरेंद्र**—नाहीं. लोकांची इच्छा असल्यावांचून तें तुला कालत्रयीं मिळावयाचें नाहीं.

**भु०**—पण लोकांचा या बाबतींत अर्थाअर्थीं संबंध काय ?

**सुरेंद्र**—लोकांचा हा जन्मसिद्ध हक्कच आहे.

**काम०**—जन्मसिद्ध हक्कच आहे ? कोण म्हणतो जन्मसिद्ध हक्कच आहे म्हणून ? राजे म्हणजे कांहीं प्रजांच्या कुशींत जन्माला येत नाहींत. ते स्वयंभू आहेत-स्वयंसिद्ध आहेत.

**सुरेंद्र**—राजांच्या स्वयंभूपणाचा आणि स्वयंसिद्धपणाचा मनु आतां राहिलेला नाहीं. आतां राजांना जन्माला यावयाचें असेल तर त्यांना प्रजांच्या कुशीचाच आश्रय करणें भाग आहे. नाहीं तर जन्मास येण्याचा नादच त्यांनीं आजिबात सोडून दिला पाहिजे.

**सुरेंद्र**—कां ? इतक्यांतच ब्रह्मदेवाचें दिवाळें निघालें वाटतें ? जगाच्या पाठीवर आजही स्वयंभू आणि स्वयंसिद्ध राजे अनेक आहेत. ते प्रजांचा स्वयंनिर्णयाचा हक्क मानीत नाहींत व त्यांच्या निर्णयाला जुमानीत नाहींत.

**सुरेंद्र**—आज जुमानीत नसले तरी उद्यां त्यांना प्रजांचा हा हक्क मानावाच लागेल व त्यांच्या निर्णयापुढें आपल्या माना बिनतक्रार वांकवाव्याच लागतील. निदान कैरवांत तरी राजांच्या कपाळची ही आपत्ति यापुढें खास टळावयाची नाहीं.

**काम०**—टळावयाची नाहीं ? कैरवांत टळावयाची नाहीं ? पहात्यें-पहात्यें कशी टळावयाची नाहीं ती ! सुरेंद्र, कैरव प्रजाजनांचा हा हक्क मी मानीत नाहीं व त्यांनीं या बाबतींत दिलेला निर्णय साफ जुमानीत नाहीं. कैरवांचें राजसिंहासन माझें आहे आणि लोकांच्या निर्णयाला पायाखालीं तुडवून मी त्यावर आरोहण करीन ही माझी प्रतिज्ञा आहे.

**सुरेंद्र**—ही प्रतिज्ञा फुकट आहे. कैरवांनीं कल्पलतेला आपली राणी निवडली आहे आणि सारी दुनिया उलटली तरी तीच कैरव राजसिंहासनावर आरूढ होईल, यांत तिळमात्रही शंका नाहीं.

**काम०**—या कुडींत प्राण असेपर्यंत कल्पलतेला कैरव-राजसिंहासनावर नुसती दृष्टिसुद्धां मी टाकूं देणार नाहीं. मग त्यावर आरूढ होण्याची गोष्ट कशाला ?

**सुरेंद्र**—सर्व राष्ट्राचा पाठिंबा असल्यावर कल्पलतेच्या मार्गांत आड येण्याची तुझी काय छाती आहे ?

**काम०**—काय छाती आहे ? दिसेल-दिसेल काय छाती आहे ती ! घोडामैदान नजीकच आहे. ज्याच्या बळावर तुम्ही उड्या मारीत आहांत त्या कैरव राष्ट्र-

सुद्धां कल्पलतेला जमिनींत जिवंत गाडून टाकली नाहीं तर नांवाची कामलताच होणार नाहीं.

**सुरेंद्र**—कामलते, राष्ट्राची इच्छा–राष्ट्राचा हक्क–राष्ट्राचा हुकूम धुडकावण्याचें साहस करशील तर तुला राज्यासह प्राणालाही मुकावें लागेल.

**काम०**—बेहेत्तर आहे. सत्ता नाहीं–स्वातंत्र्य नाहीं–मग मढ्याप्रमाणें जगांत जिवंत रहाण्यांत भूषण तरी काय आहे ? जगावयाचें असेल तर कैरव राष्ट्राच्या शिरावर पाय देऊनच मी जगेन, नाहींतर पार धुळीला मिळून जाईन.

**सुरेंद्र**—तर मग तुला धुळीलाच मिळावें लागेल. कैरवराष्ट्र मानी आहे–बाणेदार आहे. तें आपल्या सर्वस्वावर तिलांजलि देईल; पण आपल्या स्वयंनिर्णयाच्या जन्मासिद्ध हक्काला लाथाडून तें आपल्या शिरावर तुला केव्हांही नाचूं देणार नाहीं.

**काम०**—तर मग होऊंच द्या आतां सामन्याला सुरुवात. आतां हें भांडण कामलता आणि कल्पलता या दोन व्यक्तींमधील राहिलें नसून दोन तत्त्वांतील झगड्याचें स्वरूप त्याला आतां प्राप्त झालें आहे. राजसिंहासनाची प्राप्ति जन्मावर अवलंबून ठेवावयाची, कीं लोकनिर्णयावर अवलंबून ठेवावयाची, असा स्पष्ट सवाल आज उपस्थित झाला आहे. मी ही बाब लोकनिर्णयावर अवलंबून ठेवावयाला बिलकुल तयार नाहीं. राजसिंहासन हा राजकुलोत्पन्न व्यक्तींचा ईश्वरदत्त हक्क आहे—लोकांचा त्याच्याशीं काडीइतकाही संबंध नाहीं, असें माझें स्पष्ट मत आहे, आणि तें प्रस्थापित करण्याचा माझा कृतनिश्चय आहे. तेव्हां सुरेंद्र, मी आपणाला अखेरचा जबाब विचारतें. आपण माझा पक्ष घेऊन लोकांशीं झगडण्याला तयार होणार का लोकांचा पक्ष घेऊन माझा विश्वासघात करणार ? बोला.

**सुरेंद्र**—मी प्रथमपासून लोकपक्षाचाच अभिमानी होतों, आतांही लोकपक्षाचाच अभिमानी आहे आणि पुढेंही जिवांत जीव असेपर्यंत लोकपक्षाचाच अभिमानी रहाणार.

**काम०**—पण अशा वर्तनानें माझ्या प्रेमाला आपल्याला कायमचें मुकावें लागेल, याची आपल्याला कांहीं कल्पना आहे का ?

**सुरेंद्र**—तत्त्वापुढें मला कशाचीही जाणीव नाहीं–कशाचीही मातब्बरी नाहीं. कामलते,—

पद—कातर न धीट०

**ही प्रणयसार-सरिता ॥ सरलता ॥ प्रथम दावि परि धरि परिणामीं । गहन कुटिला पथा विपरिता ॥ धृ० ॥ तारि तत्त्व-निष्ठा-बल-नौका ॥ दुराचार करि ठार सुखरता ॥ १ ॥**

**काम०**—सुरेंद्र, तुम्ही अखेरीस माझा विश्वासघात केलात—माझा प्रेमभंग केलात.

पद—गझल. ना मै पेहेरू०

**प्रेमवीणा–नाद–लहरी । जीवनाची जी कला ॥ भंगुनी ती जिवलगा हा । जीव जीवें मारिला ॥ धृ० ॥ करुनि ऐसी । बे-इमानी ॥ नार अबला नाडिली ॥ भाव भोळा कामिनीचा ॥ आज पायीं तुडविला ॥ १ ॥**

**सुरेंद्र**—स्वार्थासाठीं माझ्या राष्ट्राच्या जन्मसिद्ध हक्कांची पायमल्ली करूं इच्छिणाऱ्या स्त्रीवर प्रेम करणें मला शक्य नाहीं.

**काम०**—काय? शक्य नाहीं?

**सुरेंद्र**—नाहीं—शक्य नाहीं.

**काम०**—सुरेंद्र, विचार करा—विचार करा—

**सुरेंद्र**—केला—पूर्ण विचार केला. राष्ट्रघातकी स्त्रीवर प्रेम करणें हें प्रत्यक्ष राष्ट्रघातापेक्षांही भयंकर पातक आहे.

**काम०**—ठीक आहे. तुम्हाला माझ्या प्रेमाची पर्वा नाहीं तर मलाही तुमच्या प्रेमाची पर्वा नाहीं. तुम्ही राष्ट्राभिमानाचें केवढेंही सोंग आणलेंत तरी मी त्याला फसावयाची नाहीं. आपण हा जो माझा घात करीत आहांत तो राष्ट्रासाठीं नसून कल्पलतेच्या प्रेमासाठीं करीत आहांत, हें मी पक्कें जाणून आहें. पण याद राखून ठेवा—ज्यानें माझी मान मुरगळली त्याला कल्पलतेचा हात मी प्राण गेला तरी धरूं द्यावयाची नाहीं.

**सुरेंद्र**—कल्पलतेच्या पाणिग्रहणाची इच्छा या मनाला स्वप्नांतही शिवलेली नाहीं आणि पुढेंही कधीं शिवणार नाहीं. या जन्मांत हें चित्त एकाच स्त्रीच्या ठिकाणीं—फक्त एकाच स्त्रीच्या ठिकाणीं लुब्ध झालें होतें—आणि तेंही कामलते, तुझ्याच ठिकाणीं लुब्ध झालें होतें. परंतु तूं आज स्वार्थासाठीं त्याचा धिःकार केलास—अव्हेर केलास. तेव्हां आतां यापुढें या सुरेंद्राला जगांत स्त्रीप्रेम हा विषयच शिल्लक राहिलेला नाहीं. आतां हें अंतःकरण फक्त एकाच ठिकाणीं

गुंतलेलें राहील आणि तेंही या माझ्या प्रियतम मातृभूमीच्या चरणाच्या ठिकाणींच गुंतलेलें राहील. इथून राष्ट्रदेवता हेंच माझें आराध्यदैवत आणि त्याच्याच आराधनेंत माझें जीवित मी खर्च करणार.

**काम०**—करा-खुशाल करा. मला आतां तुम्ही काय करतां आणि काय करीत नाहीं याचा विचार करण्याचें कारणच उरलें नाहीं. माझा मार्ग निराळा-तुमचा मार्ग निराळा.

**सुरेंद्र**—ठीक आहे. तशींच तुझी इच्छा आहे तर होऊन जाऊं दे. पण जातां जातां मी तुला एक इषारा देऊन ठेवतों, तेवढा मात्र लक्षांत ठेव. मीं आपली तलवार कल्पलतेच्या चरणावर अर्पण केली आहे आणि तिचें संरक्षण करीत असतां ती कोणावरही चालविण्याचा प्रसंग आल्यास माझें मन तिळमात्रही कचरणार नाहीं.

**काम०**—सुरेंद्र, तुमच्या तलवारीचा धाक मला दाखवूं नका. तुमच्याच काय पण प्रत्यक्ष कृतान्त काळाच्या तरवारीपुढें सुद्धां ही कामलता अशी छाती वर काढून निर्भयपणानें ताठ उभी राहील. तेव्हां चालवा-खुशाल आपली तलवार एकदां सोडून दहादां-शंभरदां-माझ्यावर चालवा-मी तिला भीत नाहीं. जा-या मस्तकाला कल्पलतेच्या पायाच्या धुळीचा डाग लागावयाचा असेल तर तो तें तुटून पडल्यावरच लागेल-एरवीं लागणार नाहीं. जा-आतां हा शब्दांचा सामना बस् झाला.

**सुरेंद्र**—ठीक आहे येतों मी. मित्रत्वाच्या नात्याची ही आतां आपली शेवटचीच भेट. यापुढें सुरेंद्र कामलतेचा शत्रु—

**काम०**—आणि कामलता सुरेंद्रांची शत्रु !

**सुरेंद्र**—ठीक आहे.

**काम०**—बस्. प्रेमाचा खेळ आतां खलास. ( सुरेंद्र जातो ). दगलबाज-गळेकापू-मांग ! पाणी नसेल तेथें सुळावर चढविला पाहिजे.

**भु०**—कां ? आला प्रत्यय ? झाली खात्री ? का अजूनही कांहीं शंका उरली आहे ?

**काम०**—नाहीं-मुळींच नाहीं. आतां माझे डोळे लख्ख उघडले. आजपर्यंत या बेमानानें मला चकविलें-ठकविलें ! पण कांहीं हरकत नाहीं. याचा पुरा बदला मी घेईन-सोडणार नाहीं.

**भु०**—तर मग आतां उद्दामकेतूशीं संधान ?

**काम०**—उद्दामकेतूशींच काय पण प्रत्यक्ष सैतानाशींही स्नेह करण्यास मी तयार आहें. मग त्यापायीं माझी राखरांगोळी झाली तरी बेहेत्तर !

**भु०**—ठीक ठीक. पण आपण स्वतः उद्दामकेतूच्या दरबारीं गेलें पाहिजे.

**काम०**—होय. साक्षात् मृत्यूच्याही दरबारांत जाण्याला माझी हरकत नाहीं.

**भु०**—वा ! मग तर काय काम फत्तेच झालें ! ( स्व० ) उद्दामकेतूचा दरबार म्हणजे साक्षात् मृत्यूचाच दरबार आहे. तेव्हां तेथें पाऊल पडलें म्हणजे तें परतण्याची भितीच नको. ( उघड ) चला. येथून न कळत निसटण्याच्या तयारीला आतां आपल्याला ताबडतोब लागलें पाहिजे.

**काम०**—तुम्ही पुढें व्हा. मी आलेंच.

**भु०**—(स्व०) झालें ! हुरळली मेंढी लागली लांडग्याच्या मागें ! (जातो).

**काम०**—(स्वगत) बस्. आतां या क्षणापासून सारी दयामाया मी पार झुगारून दिली आहे. वाटेल तिकडे जाईन, वाटेल त्याचे पाय धरीन, वाटेल तें पाप करीन; पण या अपमानाचा बदला घेतल्यावांचून रहाणार नाहीं.—

पद—घोर घोर०—

**मानभंग । हा दुभंग । करि मादिया हृदया ॥ क्रोधभरें भडकें मन तुफान । नच मानी आतां ममता माया ॥ धृ० ॥ खर वैरानल दाहि दिशा ॥ पसरुनि झणिं हा करिल विनाशा ॥ दुर्धर रणिं ॥ धरिल धरणि । रक्तरंग ॥ १ ॥**

( जाते ).

---

## प्रवेश. ३ रा.



[ कैरव राजसभा. कल्पलतेचा राज्याभिषेकोत्सव ].

**सुरेंद्र**—परमपूज्य धर्मप्रतिनिधि, दाक्षिणात्य राजमंडळांतील मान्यवर भूपाल, आणि कैरव महासभेंतील सन्मान्य सभासदहो, आजच्या मंगल प्रसंगीं कैरव महासभेचा अध्यक्ष या नात्यानें मी आपणां सर्वांचें प्रेमादरपूर्वक स्वागत करितों. आजच्या दरबारचा उद्देश आपणां सर्वांना पूर्वविदित असल्यामुळें त्याचा पुनरुच्चार करण्याचें कांहीं कारण नाहीं. तेव्हां आतां याहून अधिक विस्तारानें न बोलतां, कैरव महासभेनें दिलेला, दाक्षिणात्य राज-

मंडळानें एकमतानें स्वीकारलेला आणि सर्वश्रेष्ठ धर्मसिंहासनानें प्रेमाशीर्वादपूर्वक मान्य केलेला निर्णय आपणां सर्वांच्या अनुमतीनें व साक्षीनें अमलांत आणण्याच्या व्यवस्थेला मी लागतों. राजकन्ये, लोकनिर्णयानुसार हें कैरव राजसिंहासन आतां तुझ्या मालकीचें झालें असून तें मी अत्यंत नम्रतापूर्वक तुझ्या स्वाधीन करितों, त्याचा स्वीकार कर. (सिंहासनावर चढवितो). आतां हा राजमुकुट राजकन्येनें मस्तकावर धारण करावा. ( मुगुट तिच्या मस्तकावर ठेवूं लागतो.इतक्यांत पडद्यांत "थांबा–थांबा—कल्पलतेला राजमुगुट अर्पण करूं नका. तो धारण करण्याचा तिला अधिकार नाहीं." ) कोणाचे शब्द हे ? कल्पलतेला हा मुगुट धारण करण्याचा अधिकार नाहीं असें म्हणण्याचें साहस करणारा कोण ?

( तक्षक प्र. क. )

**तक्षक**—मी–तक्षक–

**सर्व**—कोण ? तक्षक ?

**तक्षक**—होय–तक्षक–जगद्विख्यात, महाबलाढ्य कांतारसम्राट् महाराजाधिराज उद्दामकेतू महाराज यांचा वकील.

**सुरेंद्र**—कोण ? कांतारसम्राटाचा वकील–आणि राणी कल्पलतेला हा मुगुट धारण करण्याचा अधिकार नाहीं म्हणतो ?

**तक्षक**—होय–कांतारसम्राटाचा वकील, कांतारसम्राटाच्या आज्ञेनें, आपणास पुनः बजावून सांगतों कीं हा मुगुट आपण कल्पलतेच्या मस्तकावर ठेवूं नका. तो धारण करण्याचा तिला बिलकुल हक्क नाहीं.

**सुरेंद्र**—कैरवांनीं प्रचंड बहुमतानें कल्पलतेला आपली राणी निवडली आहे, ही गोष्ट कांतारसम्राटाच्या कानावर गेलेली नाहीं का ?

**तक्षक**—गेलेली आहे. परंतु राजा निवडण्याचा लोकांचा हक्क कांतारसम्राटाला मान्य नाहीं.

**सुरेंद्र**—कांतारसम्राटाला हा हक्क मान्य नसेल तर त्यानें आपल्या राज्याच्या हद्दींत खुशाल काय वाटेल तो गोंधळ घालावा. कैरवांवर आपली अमान्यता बलात्कारानें लादण्याचा त्याला अधिकार काय ? कैरव कांहीं कांतारसम्राटाचे अंकित नाहींत. ते स्वतंत्र आहेत आणि त्यांच्या राज्यकारभारांत ढवळाढवळ करण्याचा कोणालाही हक्क नाहीं.

**तक्षक**—कैरव स्वतंत्र असले व त्यांच्या राज्यकारभारांत हात घालण्याचा कोणालाही हक्क नसला तरी राजकन्या कामलता इनें कांतारसम्राटाकडे या बाबत फिर्याद गुदरली असल्यामुळें कैरवांना असल्या प्रकारची आज्ञा करण्याचा त्याला आतां न्यायानें व धर्मानें हक्क प्राप्त झाला आहे. तेव्हां कांतारसम्राटाकडून या फिर्यादीचा निकाल केला जाईपर्यंत कल्पलतेचें राज्यारोहण तहकूब करण्यांत आलेंच पाहिजे.

**सुरेंद्र**—शक्य नाहीं. कामलतेनें फिर्याद गुदरली असेल तर तिला वाटल्यास उद्दामकेतूनें आज्ञा करावी आणि तिनें वाटल्यास त्याची आज्ञा डोक्यावर घेऊन खुशाल नाचावें. आमचा कांतारसम्राटाशीं अर्थाअर्थी कांहींही संबंध नाहीं व त्याचा शब्द मस्तकावर झेलण्यास आम्ही कोणत्याही प्रकारें बांधलेले नाहीं.

**तक्षक**—कैरवाध्यक्ष, तुमच्या या उद्धटपणाचा परिणाम काय होईल याची तुम्हाला कांहीं कल्पना आहे कां ? कांतारसम्राटाचा आज्ञाभंग म्हणजे साक्षात् मृत्यूला निमंत्रण आहे. कांतारसम्राट् वाटेल तो अपराध पोटांत घालील; पण आज्ञाभंग एक क्षणभरही त्यास सहन होणार नाहीं.

**सुरेंद्र**—न झाला तर आम्हाला त्याची पर्वा नाहीं. आपण काळाचेही काळ आहोंत असें कांतारसम्राटास वाटत असेल तर त्यानें आपला कालदंड खुशाल आमच्यावर चालवावा. पण ज्याला आम्हाला आज्ञा करण्याचा बिलकुल अधिकार नाहीं, त्याच्या शब्दापुढें आमचें मस्तक प्राणांतींही नम्र व्हावयाचें नाहीं.

**तक्षक**—दाक्षिणात्य राजमंडळांतील थोर भूपालहो, कांतारसम्राटाचा हात असलेला आज्ञाभंग व अपमान तुम्हाला मान्य आहे का ?

**१ राजा**—कांतारसम्राटाला विकत श्राद्ध घेऊन सव्यापसव्य करीत बसण्याची ही नसती उठाठेव सांगितली होती कोणी ?

**तक्षक**—दुष्टांपासून दीनांचें व सज्जनांचें संरक्षण करणें हा समर्थांचा धर्मच आहे.

**२ राजा**—तर मग कैरवाध्यक्षांकडून कांतारसम्राटाला मिळालेला जबाब सर्वथैव योग्य आहे.

**तक्षक**—सर्वथैव योग्य आहे ? भूपालहो, कैरवाध्यक्षांच्या दुर्वर्तनाचा कडक शब्दांनीं निषेध करण्याचें सोडून तुम्ही त्यांची तरफदारी करीत आहांत, हें तुम्हाला परिणामीं तापदायक झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

**३ राजा**—असल्या धमकावण्यांनीं राजमंडळांतील राजे भेदरून जातील, असें समजूं नका.

**तक्षक**—ठीक आहे. जिभेच्या चवचालपणाचा जबाब जिवाच्या आहुतीनें द्यावा लागेल, हें खूप समजून असा. धर्मप्रतिनिधि, राजमंडळांतील या उद्दाम भूपालांप्रमाणेंच आपलाही अभिप्राय आहे काय ?

**धर्मप्रतिनिधि**—होय. आमचाही असाच अभिप्राय आहे. धर्मसिंहासनानें मान्य केलेल्या लोकनिर्णयाच्या तत्त्वाच्या विरोधकांना धर्मसिंहासनाची केव्हांही साहानुभूति मिळावयाची नाहीं.

**तक्षक**—अरेरे ! तुम्ही सारेच कसे असे पागल बनलांत ? कांतारसम्राट् म्हणजे उकिरड्यावरील कीटक आहे अशी कां तुमची समजूत आहे ?

**सुरेंद्र**—कांतारसम्राट उकिरड्यावरील कीटक नसून एक महाबलाढ्य भूपाल आहे, असेंच आम्ही समजत आहोंत. पण तो केवढाही समर्थ असला, त्याचें बल कितीही अमर्याद असलें तरी लोकांवर जुलूम करण्याचा त्याला अधिकार आहे, असें तो मानीत असेल तर तें आम्ही मात्र बिलकुल चालूं देणार नाहीं.

**तक्षक**—लोकांकडून आपली इच्छा व आपली आज्ञा मान्य करविण्याचा प्रबलांचा व समर्थांचा जन्मसिद्ध हक्कच आहे व तो तुमच्यासारख्या दुर्बल पामरांनीं बिनतक्रार मान्य केलाच पाहिजे. तेव्हां राजमंडळांतील मान्यवर भूपाल व परमपूज्य धर्मप्रतिनिधि, मी पुनः आपणांस एकवार नम्रतापूर्वक बजावतों कीं, कैरवाध्यक्षांस तुम्ही या आत्मघातापासून परावृत्त करा, व त्यांच्या अदूरदर्शित्वामुळें ओढवणारी भावी अनर्थपरंपरा टाळा. निष्कारण दुराग्रहाला पेटून कांतारसम्राटास चिडवूं नका. दुर्बलांचा दुराग्रह परिणामीं त्यांच्या आत्मनाशाला कारण होतो, हा दुनियेचा नित्याचा अनुभव आहे. तुमच्या उत्तेजनामुळें कैरवाध्यक्षांनीं कांतारसम्राटाचा आज्ञाभंग केला असें जर कांतारसम्राटाच्या कानावर गेलें तर त्याच्या कोपाला कैरवांबरोबर तुम्हां सर्वांनाही नाहक बळी पडावें लागेल. तेव्हां विचार करा व अजून शुद्धीवर या; आणि कांतारसम्राटाच्या आज्ञाभंगापासून कैरवांना परावृत्त करा.

**सुरेंद्र**—तक्षक, आतां हा तुमचा आचरटपणा पुरे करा. तुमच्या सम्राटाचा संदेश आम्हांला कळला व आमचा जबाब तुम्हाला कळला. आतां निष्कारण कंठशोष करण्यांत कांहीं हंशील नाहीं. स्वस्थपणानें तुम्हांला इथें बसावयाचें

असेल तर येथें थांबण्याला माझी तुम्हाला परवानगी आहे. नाहीं तर तुमचें कार्य संपलें असल्यामुळें तुम्हाला येथें थांबण्याची आतां बिलकुल जरूर नाहीं. ( कल्पलतेस ) हा मुगुट मी सरकारांच्या मस्तकावर ठेवतों, तो सरकारांनीं धारण करावा.

**तक्षक**—राजकन्ये-राजकन्ये-थांब-थांब. तूं तरी या आत्मघातकी साहसास प्रवृत्त होऊं नकोस. कांतारसम्राटाचा कोप मोठा कठीण आहे.

**कल्प०**—तक्षक, कांतारसम्राटाच्या कोपाला राणी कल्पलता कवडीचीही किंमत देऊं इच्छीत नाहीं. मला या मुगुटाचा लोभ आहे म्हणून कांतारसम्राटाची आज्ञा धिःकारून मी त्याचा स्वीकार करीत आहें, अशांतला मुळींच अर्थ नाहीं. परंतु कांतारसम्राटानें लोकनिर्णयाच्या तत्त्वावर घाव घालण्यासाठीं हात उगारला असल्यामुळें त्याची आज्ञा पायाखालीं तुडवून या तत्त्वाला उचलून धरण्यासाठीं मला या मुगुटाचा स्वीकार करणें अवश्य आहे. कांतारसम्राट् केवढाही बलाढ्य असला तरी त्याच्या सामर्थ्याला भिऊन अंगिकारिलेल्या तत्त्वाचा त्याग करावयास मी साफ तयार नाहीं. मी हा मुगुट आपल्या मस्तकावर धारण करणार आणि कांतारसम्राटासारख्या लष्करी बाण्यानें शेंफारलेल्या बलाढ्य राजा-महाराजांच्या धमक्यांना आणि विरोधाला न जुमानतां लोकनिर्णयाचें दिव्य तत्त्व जगांत जिवंत नांदूं शकतें ही गोष्ट मी आपल्या उदाहरणानें जगाला सिद्ध करून दाखविणार. मग त्या पायीं माझें वा माझ्या राष्ट्राचें केवढेंही नुकसान झालें तरी मला त्याची पर्वा नाहीं. ( मुगुट धारण करते ).

**तक्षक**—अरेरे ! राजकन्ये, कांतारसम्राटाची आज्ञा पायाखालीं तुडवून तूं हा कैरव राजमुकुट आज मोठ्या दिमाखानें आपल्या मस्तकावर धारण केला आहेस तो त्या ठिकाणीं फार वेळ टिकणार नाहीं, हें खूप समजून ऐस.

**कल्प०**—धडापासून मस्तक तुटल्यावांचून मस्तकापासून मुगुट अलग होणार नाहीं, हें तुम्हीही खूप समजून असा.

**तक्षक**—धडापासून मस्तक अलग होण्यास काय उशीर आहे ? या आज्ञाभंगाची वार्ता कांतारसम्राटाच्या कानीं पडतांच कांतारसेनासमुद्राच्या लाटा कैरवराज्यावर येऊन आदळल्याच म्हणून समजा.

**कल्प०**—आदळूं द्या-खुशाल आदळूं द्या. कैरववीरांनींही कांहीं हातांत

कांकणें भरलेलीं नाहींत. कांतारसेनानायकांची युद्धाची हौस ते मोठ्या आनंदानें पूर्ण करतील.

**तक्षक**—प्रबलांची युद्धाची हौस पुरविण्याच्या वल्गना दुर्बलांनीं करणें म्हणजे काजव्यांनीं सूर्याला दिपविण्याची हांव धरण्यासारखें आहे. कांतार-सम्राटाची एक चपराक तुम्हा सर्वांची बत्तिशी रंगविण्यास समर्थ आहे. तेव्हां निष्कारण असें उसनें अवसान अंगीं आणून सिंहाचें आयाळ उपटण्याचें धाडस करूं नका. त्यापासून कांहीं लाभ व्हावयाचा नाहीं. सिंहाच्या आयाळाचा एक केंसही उपटला न जातां तुमचीं नरडीं मात्र त्याच्या नखा-दांतांनीं कडाकड फोडलीं जातील.

**कल्प०**—बेहत्तर आहे. शत्रूपुढें माना वांकविण्यापेक्षां त्याच्या शस्त्रांखालीं त्या तुटून पडलेल्याच शतपटीनें श्रेयस्कर आहे. लोकनिर्णयाचें तत्त्व मानवी नसून ईश्वरी आहे; व त्याच्या प्रस्थापनेकरितां एखाद्या बलाढ्य सम्राटाच्या तल-वारीला एखाद्या दुर्बल राष्ट्राचा बळी पडल्यास त्याची पर्वा करण्याचें कारण नाहीं. असलीं दिव्य तत्त्वें प्रस्थापित होण्यासाठीं, एकाच काय पण अनेक राष्ट्रांचें बलिदान करावें लागतें. कैरवांनीं या महत्कार्याला प्रारंभ केला आहे आणि त्याच्या सिध्यर्थ वाटेल तो आत्मयज्ञ करण्याची त्यांची तयारी आहे.

**तक्षक**—अस्सें काय ? ठीक–ठीक–पाहून घेऊं. राजमंडळांतील मूढ भूपा-ल्हो, तुम्हीही आतां संभाळून असा. कैरवांच्या या भयंकर गुन्ह्यांत तुम्ही त्यांचे साथीदार असल्यामुळें कांतारसम्राटाचा क्रोधाग्नि तुम्हालाही जाळून-पोळून खाक केल्यावांचून रहाणार नाहीं.

**१ राजा**—कांतारसम्राटाच्या क्रोधानलांत जळून खाक होण्याला कैरवां-प्रमाणें आम्हीही सर्व आनंदानें तयार आहोंत.

**तक्षक**—आणि धर्मसिंहासनालाही मी निर्वाणीचा इषारा देऊन ठेवतों कीं येथून तीन दिवसांच्या आंत धर्मसिंहासनानें आपलें वजन खर्च करून या उद्दाम लोकांना ताळ्यावर आणलें नाहीं आणि यांच्याकडून कांतारसम्राटाची बिनशर्त माफी मागविली नाहीं तर धर्मसिंहासनाच्या इभ्रतीला आणि अस्तित्वालासुद्धां धोका पोहोंचल्यावांचून रहाणार नाहीं.

**धर्मप्रति०**—सत्पक्षाला असत्पक्षापुढें मान वांकविण्याचा उपदेश धर्म-

सिंहासनाकडून कालत्रयीं केला जाणार नाहीं. धर्म हा वीरवृत्तीचा पुरस्कर्ता आहे-शरणागतीचा पुरस्कर्ता नाहीं.

**तक्षक**—ठीक आहे. कांतारसम्राटाचा चपेटा बसला म्हणजे या सर्व वल्गना फोल ठरल्यावांचून रहाणार नाहींत, हें पक्कें लक्षांत असूं द्या. ( जातो ).

**सुरेंद्र**—आजपासून कैरवावर राणी कल्पलतेची सत्ता सुरू झाली आहे, असें आम्ही जाहीर करतों. ( जयजयकार होतो ).

**१ प्रजा०**—कैरव राजसिंहासनाशीं आम्ही यावज्जन्म इमानें इतबारें वागूं, अशी आम्ही शपथ करतों.

**कल्प०**—कैरव प्रजाजनांचें स्वातंत्र्य आणि हित संरक्षण करण्याच्या कामीं मी कायावाचामनेंकरून झटेन असें परमेश्वरास साक्ष ठेवून मीही आश्वासन देतें.

**१ राजा**—कैरव राजसिंहासनाशीं आणि कैरव राष्ट्राशीं आमचाही स्नेह अभंग राहील, असें दाक्षिणात्य राजमंडळाच्या वतीनें मी अभिवचन देतों.

**धर्मप्रति०**—धर्मसिंहासनानें मान्य केलेल्या लोकनिर्णयाच्या तत्त्वाला आणि तदनुसार स्थापित झालेल्या राणी कल्पलतेच्या सत्तेला धर्मसिंहासनाकडून सदैव पाठिंबा मिळेल, असा धर्मसिंहासनातर्फे आम्हीही आशीर्वाद देतों.

( जयजयकार ! पडदा पडतो. )—

## अंक १ ला समाप्त.



# अंक २ रा.



## प्रवेश १ ला.



( कांतारसम्राट् उद्दामकेतू यांच्या राजवाड्यांतील दरबारी दिवाणखाना. उद्दामकेतू. तक्षक व सेनानायक ).

**उद्दामकेतू**—सेनानायकहो, सर्वश्रेष्ठ धर्मसिंहासनाधिपति श्रीमज्जगद्‌गुरु स्वामी धर्मानंद यांनीं, कामलता आणि कल्पलता यांच्यामध्यें तडजोड घडवून आणण्यासाठीं सुरूं केलेल्या प्रयत्नास आमची संमति विचारल्यावरून ती आम्ही त्यांस दिलेली आहे. तथापि तेवढ्यावरून कैरवांवरील स्वारीचा बेत आम्ही आजिबात सोडून दिला, असें समजून आपण बिलकुल निराश होऊं नका, आणि युद्धाच्या तयारींत यत्किंचितही कसूर करूं नका. राजकारणांत भांडणापूर्वी आणि भांडण सुरूं असतां तडजोडीच्या नांवाचा जप एकसारखा सुरूं ठेवावाच लागतो; आणि त्यांतही एखाद्या सन्मान्य त्रयस्थानें तडजोडीची इच्छा दर्शविल्यास तिचा अनादर करून जगाच्या सहानुभूतीला आंचवणें केव्हांही शहाणपणाचें नसतें. तेव्हां आमच्या संमतीचा तुम्ही भलताच अर्थ करूं नका. आम्हांला तडजोड बिल्कुल नको आहे आणि जरी तिची घोषणा आम्ही आपल्या तोंडानें एकसारखी सुरूं ठेवला, तरी ती आम्ही कालत्रयीं घडून येऊं देणार नाहीं, ही आपल्या मनाची खात्री असूं द्या.

**सेना०**—पण धर्मानंदाच्या वचनानें कामलता तडजोडीला तयार झाली तर?

**उद्दाम०**—तिची छाती नाहीं तयार होण्याची. आम्ही तिला आमच्या मगरमिठींत इतकी मजबूत पकडून ठेवली आहे कीं मेल्याशिवाय तिच्यांतून तिची सुटका होणेंच आतां शक्य नाहीं. कैरवावरील स्वारीच्या नेतृत्वाचा मान तिला अर्पण करण्याचा आमचा निश्चय आम्ही तिला कळविल्यापासून तर तिचें मन रणोत्साहाच्या उन्मादानें अगदीं बेहोष बनून गेलें असून, ती आतां, तडजोडीचें नुसतें नांवसुद्धां कोणाला उच्चारूं देत नाहीं; आणि म्हणूनच तडजोडीला तयार होण्याची संधि तिला मिळूं नये एवढ्यासाठीं कैरवांवरील स्वारीच्या

नेतृत्वाचा मान आजच तिला बहाल करण्याचें आम्ही ठरविलें आहे. तेव्हां तिच्या संबंधानें फिकीर करण्याचें आपल्याला कांहींच कारण नाहीं.

**सेना०**—जशी सरकारांची मर्जी.

**उद्दामकेतू**—तर मग ठरल्याप्रमाणें आपणां सर्वांच्या संमतीनें कैरवांवरील स्वारीच्या नेतृत्वाचा मान आतां आम्ही कामलतेला बहाल करितों.

**१ सेनानायक**—आमची बिलकुल हरकत नाहीं.

**उद्दाम०**—तक्षक, कामलतेला आणि भुजंगाला आंत घेऊन या.

**तक्षक**—जशी सरकारांची आज्ञा.

[ जाऊन कामलता व भुजंग यांस आणतो ].

**उद्दाम०**—कामलते, कैरवांवरील स्वारीच्या नेतृत्वाचा मान तुला अर्पण करण्याला आमच्या सेनानायकांनीं आम्हाला मोठ्या आनंदानें संमति दिलेली आहे, हें तुला कळविण्याला आम्हाला फार संतोष वाटतो.

**काम०**—या औदार्याबद्दल मी महाराजांची व या सन्मान्य सेनानायकांची अत्यंत आभारी आहें.

**उद्दाम०**—तर मग घे-ही सेनाध्यक्षाची तलवार आम्ही तुला अर्पण करितों, तिचा स्वीकार कर. ( तलवार तिला देतो ). कामलते, ही तलवार नसून, महाबलाढ्य कांतारसाम्राज्याची लोकोत्तर कीर्ति आज मोठ्या विश्वासानें आम्ही तुझ्या स्वाधीन करीत आहोंत. तेव्हां तिचें प्राणापलिकडे जतन कर, एवढेंच आमचें तुला वारंवार आग्रहाचें सांगणें आहे.

**काम०**—राजाधिराजांनीं त्याबद्दल अगदीं निर्धास्त असावें. मी आपले प्राण खर्ची घालीन, पण या तलवारीच्या यशाला अपजयाचा डाग केव्हांही लागूं देणार नाहीं.

**उद्दाम०**—आनंद होतो हें ऐकून. सेनानायकहो, आतां तुम्हांला जाण्याला परवानगी आहे. ( सेनानायक जातात ). कामलते, कांतारसम्राटाची ही दिग्विजयी तलवार समरांगणावर यशस्वी करण्याचा पराक्रम तूं करून दाखविलास तर कैरवराजसिंहासनच काय पण प्रत्यक्ष कांतारसाम्राज्यसिंहासनसुद्धां तुझ्या सहज हस्तगत होईल, असें आम्ही तुला आश्वासन देतों.

**काम०**—राजाधिराजांची मी अत्यंत ऋणी आहें. पण राजाधिराजांच्या या थोर अनुग्रहाला मी पात्र आहें, असें मात्र मला वाटत नाहीं.

**उद्दाम०**—हा तुझा विनय आहे. पण जाऊं दे. सध्यां तुझें सारें लक्ष

कैरवराजसिंहासनानें वेधून घेतलें आहे, आणि त्यामुळें तुला अन्य कोणताही विषय रुचत नाहीं. तेव्हां तूर्त हें विषयांतर नको. येतों आतां आम्ही. तुझा प्रखर पराक्रम सदैव जागता राहो. ( तक्षकासह जातो ).

**काम०**—( स्वगत ) अस्सें काय ? दाखवावयाचे दांत आंत ओढले जाऊन चावावयाचे दांत बाहेर पडण्याला आतां सुरुवात झाली तर एकूण !

**भुजंग**—सरकारांचें हा सेवक अंतःकरणपूर्वक अभिनंदन करीत आहे.

**काम०**—अभिनंदन ? अभिनंदन कशाबद्दल ?

**भुजंग**—सरकारांच्या लोकोत्तर पराक्रमाबद्दल.

**काम०**—लोकोत्तर पराक्रम ?

**भुजंग**—होय लोकोत्तर पराक्रम. कांतारसम्राटासारख्या पाषाणहृदयीं कालपुरुषाचा अचल दृष्टिकोन सरकारांनीं पार बदलून टाकला, हा सरकारांचा लोकोत्तर पराक्रमच आहे.

**काम०**—दृष्टिकोन बदलला ? म्हणजे ?

**भुजंग**—म्हणजे नजर बदलली–वृत्ति बदलली–भावना बदलली ! आजपर्यंत कांतारसम्राट् आपल्याला आश्रित समजून परक्याप्रमाणें आपल्यापासून दोन हात दूर रहात असे. परंतु आपल्या अजब कर्तबगारीनें, त्याच्या मनांत आतां आपल्या संबंधानें आप्तभाव उत्पन्न होऊन तो आतां आपलेपणाच्या सलगीनें एकेक पाऊल आपल्याजवळ सरकूं लागला आहे; आणि माझी पक्की खात्री आहे कीं तो लौकरच आपल्यामधील अंतर कापून काढून आपल्याला एक दिवस घट्ट बिलगल्यावांचून रहाणार नाहीं. सरकार, कट्टया दुस्मानाला जिगरजान दोस्त बनवून आपण प्रेमाच्या साम्राज्यांत ही एक खरोखर अजब क्रान्ति घडवून आणली आहे.

**काम०**—भुजंग, प्रेमक्रान्तीकरितां कांहीं मी इथें आल्यें नाहीं–राज्यक्रान्तीकरितां आल्यें आहें.

**भुजंग**—पण कठोर राज्यक्रान्तीला नाजुक प्रेमक्रान्तीचें ईश्वरी अधिष्ठान मिळालें तर तो कांहीं अपघात नाहीं खास,

**काम०**—म्हणजे ? भुजंग, मी आपल्या प्रेमाचा बाजार मांडला आहे, असें तुम्ही समजतां काय ?

**भुजंग**—पण यांत बाजार कसला आहे ? बेवारशी प्रेमाचें उदक एखाद्या

अनुरूप पुरुषाच्या हातावर सोडणें हा आपल्यासारख्या कुमारीजनांचा पूर्वापार शिरस्ताच आहे.

**काम०**—पण भुजंग, माझें प्रेम कांहीं बेवारशी नाहीं. त्याला मालक आहे, आणि तोही कायमचा मालक आहे.

**भुजंग**—सरकार, आपलें प्रेम बेवारशी नसतें आणि त्याचा मालक कायमचा असता तर कांतारसम्राटाची ही तलवार आज आपल्या कंबरेला लटकतांना दृष्टीस पडलीच नसती.

**काम०**—म्हणजे ? ही तलवार हें माझ्या प्रेमाच्या बेवारशीपणाचें चिन्ह आहे कीं काय ?

**भुजंग**—अलबत्, त्यावांचून या तलवारीला दुसरा अर्थच नाहीं.

**काम०**—नाहीं–ही तलवार प्रेमाचें चिन्ह म्हणून मी धारण केलेली नाहीं. तत्त्वाचें चिन्ह म्हणून धारण केलेली आहे.

**भुजंग**—आपण तत्त्वाचें चिन्ह म्हणून धारण केली असेल. परंतु कांतारसम्राटानें कांहीं नुसत्या तत्त्वनिष्ठेकरितां ही आपल्याला खास बहाल केलेली नाहीं. कारण त्याची तत्त्वनिष्ठा कांहीं इतकी जळजळीत नाहीं. त्यांत त्याचा फार खोल कावा आहे. पण कावा जरी असला कीं नाहीं तरी तो फार गोड— तोंडाला मिठ्ठी बसण्यासारखा मिठास आहे. तेव्हां त्याला असें नाक मुरडण्याचें कांहीं कारण नाहीं.

**काम०**—असें असेल तर ही कांतारसम्राटाची तलवार याच पावलीं परत कांतारसम्राटाकडे घेऊन जा.

**भुजंग**—कां ?

**काम०**—भुजंग, सुरेंद्रानीं धिःकार केला असला तरी कामलतेचें त्यांच्या ठिकाणचें प्रेम अव्यभिचारी व एकनिष्ठ आहे. तें इतरांना कालत्रयीं प्राप्त व्हावयाचें नाहीं.

**भुजंग**—पण सरकार या तलवारीच्या सहाय्यानें कैरवराजसिंहासनाची प्राप्ति आपणाला करून घ्यावयाची आहे, हें विसरून चालणार नाहीं.

**काम०**—भुजंग, कैरव, राजसिंहासनच काय पण जगत्साम्राज्यसिंहासन जरी या तलवारीच्या मदतीनें माझ्या पायावर लोटांगण घालीत येणार असलें तरी तें सुद्धां माझ्या प्रेमाचें पावित्र्य रक्षण करण्यासाठीं मी लाथाडून टाकीन–पर्वा करणार नाहीं.

पद—देश-त्रिताल. पनियाके भरन०

**करदानिं प्रणयिनी मानि लव न विभवा ॥ सुखासुख न गणी ॥ त्यजुनि परमहित । प्रियकर-पदिं धरि अचल अनुराग-भावा ॥ धृ० ॥ सुरस सुरत-रस नीरस सारे ॥ भोगमया विषया न ठावा ॥ एकचि ललना-हृदय-विहारी ॥ प्रियतम प्राण-विसावा ॥ १ ॥**

**भुजंग**—सरकार, राजकारणांत प्रेमाचें असें फाजील बंड माजवणें चांगलें नाहीं.

**काम०**—राजकारण म्हणजे प्रेमाची आणि पावित्र्याची स्मशानभूमि असेल, तर त्याच्या अमंगल दुर्गंधांत गुदमरून, सडून, कुजून मरण्यापेक्षां सर्वसंग-परित्याग करून थेट जंगलाचा रस्ता धरण्याला सुद्धां मी मागेपुढें पहाणार नाहीं.

**भुजंग**—सरकार, जंगलाचा रस्ता धरण्याकरितां का आपण घरदार सोडून इतक्या दूरवर येथें आलांत ?

**काम०**—भुजंग, जंगलाचा रस्ता धरण्यासाठीं मी इकडे आलें नसलें तरी राजकारणांतील एका पवित्र व उदात्त तत्त्वाचें रक्षण व्हावें म्हणून मी कांतार-सम्राटाच्या पायाचा आश्रय केला आहे. आपल्या प्रेमाचा उकिरडा करावा म्हणून त्याचे पाय चाटीत मी यथें बसल्यें नाहीं. तेव्हां तत्त्वरक्षणासाठींच कांतार-सम्राटाची ही तल्वार माझ्या हातांत देण्यांत येत असेल तरच मी ती धारण करण्यास तयार आहें. नाहींतर कामलतेऐवजीं कल्पलताच काय पण रस्त्यांत भीक मागत हिंडणारी एखादी कंगाल भिकारीण जरी कैरवराजसिंहासनावर नांदली तरी त्याबद्दल देखील माझ्या चित्ताला बिल्कुल विषाद वाटणार नाहीं.

**भुजंग**—त्याबद्दल विषाद वाटला नाहीं तरी कैरवांनीं केलेल्या आपल्या भयंकर अपमानाबद्दल आपल्याला विषाद वाटलाच पाहिजे आणि आपण त्यांच्यावर सूड उगविलाच पाहिजे.

**कम०**—नाहीं. राज्यवैभवाकरितां जसें माझें मन हापापलेलें नाहीं तसेंच तें सुडासाठींही हापापलेलें नाहीं. मी हा झगडा केवळ तत्त्वाकरितां आरंभिलेला आहे; आणि तें तत्त्वसुद्धां मी माझ्या देशाच्या कल्याणाकरितांच स्वीकारलेलें आहे. तेव्हां माझा त्याग करणाऱ्या माझ्या स्वदेशबांधवांवर सूड उगविण्याच्या अधम लालसेनें प्रेरित होऊन परक्यांच्या तलवारीनें स्वदेशाची मान कापण्यास मी केव्हांहा

तयार होणार नाहीं. स्वकीयांवर सूड उगविण्यासाठीं परक्यांची तलवार हातांत धरून स्वदेशाच्या स्वातंत्र्यावर घाव घालावयास तयार होणें म्हणजे—

— पद—कुजनाश्रिता कशी० —

**परमार्थ-घातकी ॥ विनिपात हा ॥ धृ० ॥ स्वातंत्र्यहारिणी ॥ तलवार पापिणी ॥ धरिं नित निजशिरिं ॥ दीन-घात-पातका महा ॥ १ ॥**

( पडद्यांत- " शाबास ! कामलते, शाबास ! " )

**भुजंग**—शाबास ? शाबास कोण म्हणत आहे ?

**चंद्रकला**—( प्र. क. ) मी–चंद्रकला—

**भुजंग**—चंद्रकला ? कांतारसम्राटाची लाडकी कन्या चंद्रकला—

**चंद्र०**—होय, चंद्रकला–कांतारसम्राटची लाडकी कन्या चंद्रकला—

**भुजंग**—माईसाहेब, दर वेळेला आमच्या खाजगी संभाषणांत व्यत्यय आणून आपण माझा असा तेजोभंग करीत असतां, हें कांहीं चांगलें नाहीं.

**चंद्र०**—भुजंग, तुम्ही जोंपर्यंत या निर्मळ मनाच्या उदार राजकन्येला आड-मार्गाला लावण्याचा आपला दुष्ट उपद्व्याप बंद करणार नाहीं, तोंपर्यंत मी दर वेळीं तुमचा असा तेजोभंग करणारच. तुमच्यामाझ्यांत आतां जिद्द लागली आहे. या सुशील व सुस्वभावी मुलीला धुळीस मिळविण्याचा तुम्ही चंग बांधला आहे; आणि तुमच्या घातकी मगरमिठींतून तिची मुक्तता करून तिचा अधःपात टाळ-ण्याचा मी संकल्प केला आहे. तेव्हां अष्टौप्रहर तुमच्यावर खडा पहारा ठेवून दर वेळेला तुमचे दांत पाडण्याचा उद्योग मला चालू ठेवलाच पाहिजे व तो मी ठेवणारच.

**भुजंग**—पण मी यांना आडमार्गाला लावून धुळीला मिळविण्याच्या मागें लागलों आहे, हा आपला माझ्यावरील आरोप सपशेल खोटा आहे.

**चंद्र०**—खोटा आहे ? भुजंग, कांतारसम्राटाच्या पायावर आपल्या पावि-त्र्याचा बळी देऊन त्याच्या तलवारीनें स्वदेशाची मान कापण्यास तयार होणें, हा सरळ मार्ग आहे का ?

**भुजंग**—अलबत्. अंगिकारिलेल्या तत्त्वाच्या संरक्षणासाठीं वाटेल तो स्वार्थत्याग करण्यास तयार होणें हाच पुरुषार्थाचा खरा मार्ग आहे.

**काम०**—पण पावित्र्याचा बळी देऊन तत्त्वाचें रक्षण करितां येतें, ही कल्प-

नाच सपशेल खोटी आहे. पवित्र ध्येयाची सिद्धि अपवित्र साधनांनीं होऊंच शकत नाहीं.

**चंद्र०**—आणि कामलते, हा सत्य सिद्धांत तुला पूर्ण पटला असून सुद्धां आपल्या स्वदेशप्रेमाचें पावित्र्य बेगुमानपणें पायाखालीं तुडविण्यास तूं आज सज्ज झाली आहेस! प्रियकराविषयींचें आपलें प्रेम भ्रष्ट होऊं नये म्हणून स्वार्थसर्वस्वावरही लाथ मारण्यास तुला कांहीं दिक्कत वाटत नाहीं. परंतु स्वदेशाविषयींचें आपलें प्रेम निष्कलंक राखण्याचा प्रश्न उभा रहातांच तत्त्वाचें नसतें स्तोम माजवून त्याच्या नांवानें स्वदेशाची होळी करतांना तुझ्या मूढ मनाला यत्किंचितूही विषाद अगर दुःख तर वाटत नाहींच, पण उलट पराकाष्ठेचा अभिमान व आनंद वाटतो.

**काम०**—नाहीं--चंद्रकले, आपल्या देशासंबंधानें मी अजून इतकी बेकदर बनलेल्यें नाहीं. माझ्या प्रियकराविषयींच्या प्रेमापेक्षांही माझें स्वदेशप्रेम अधिक उज्ज्वल आहे; आणि त्याचें पावित्र्य रक्षण करण्यासाठीं प्रियकराच्या प्रेमावर तिलांजलि देण्यालाही मी प्रसंगीं तयार होईन--कचरणार नाहीं. मी हा जो एवढा खटाटोप आरंभिला आहे, तो, चंद्रकले, स्वदेशाला मारण्यासाठीं आरंभिलेला नाहीं; तर त्याला तारण्यासाठीं आरंभिलेला आहे.

**भुजंग**—बरोबर--अगदीं बरोबर. लोकनिर्णयाच्या खोट्या तत्त्वाच्या मागें लागल्यामुळें स्वदेशावर जी भयंकर अनर्थपरंपरा कोसळणार आहे, ती, स्वतःच्या सत्तत्त्वाची प्रस्थापना करून टाळावी आणि लोकोत्तर ऐश्वर्याच्या उत्तुंग मेरुशिखरावर स्वदेशाला विराजमान करावें, या दिव्य आणि भव्य महत्वाकांक्षेनें प्रेरित होऊन ताईसाहेबांनीं या महत्कार्यास हात घातला आहे; आणि ही गोष्ट जगप्रसिद्ध आहे.

**चंद्र०**—पण भुजंग, दुस्मानाच्या तलवारीनें स्वदेशाची मान कापून त्याला वैभवागिरिच्या उच्च शिखरावर चढविण्याचा अलौकिक पराक्रम आजवर जगांत कोणी करून दाखविला आहे का?

**भुजंग**—माईसाहेब, मी कांहीं इतिहासपुराणें वाचलेलीं नाहींत. पण तीं न वाचतांही, माझी पक्की खात्री आहे कीं असला अलौकिक पराक्रम करून दाखविल्याचीं शेंकडों--नव्हे--हजारों उदाहरणें इतिहास-पुराणांत असलींच पाहिजेत. नाहीं तर ते इतिहास कसले आणि तीं पुराणें कसलीं?—नुसता शिमगा तो.

**काम०**—आणि मी म्हणतें भूतकाळीं न झालेल्या गोष्टी वर्तमानकाळीं होते नाहींत अगर भविष्यकाळांत होणार नाहींत, असा कांहीं सृष्टीचा ठाम सिद्धान्त नाहीं. परक्यांच्या तलवारीच्या मदतीनें स्वदेशाचा उद्धार करून दाखविण्याचा अद्‌भुत चमत्कार आजवर कोणीं करून दाखविला नसला तरी मी तो करून दाखविणार आहें.

**भुजंग**—आणि ताईसाहेब तो करून दाखवितील, यांत तिळमात्रही शंका नाहीं. कारण असले अद्‌भुत चमत्कार करून दाखविण्यांत ताईसाहेबांचा हातखंडा आहे.

**चंद्र०**—कामलते, नको--या भलत्याच मोहाला बळी पडूं नकोस. तलवारीमागून दुस्मानाचें पाऊल एकदां तुझ्या घरांत शिरल्यावर तें तुझ्या घरादाराचें सपशेल वाटोळें केल्यावांचून फिरून बाहेर पडणार नाहीं.

**काम०**—त्याला बाहेर पडावेंच लागेल. नाहीं तर ज्या तलवारीनें माझ्या देशाचें रक्त माझ्या हातानें सांडलें जाईल, तीच तलवार त्या विश्वासघातकी चांडाळाची गर्दन साफ उतरून देईल--सोडणार नाहीं.

**भुजंग**—साफ उतरून देईल--सोडणार नाहीं.

**चंद्र०**—पण कामलते, आपली गर्दन तुझ्या तलवारीनें उतरून घेण्यासाठीं तो तुला अखेरपर्यंत जिवंत ठेवील, हा तुझा निव्वळ भ्रम आहे. विजयाचा अखेरचा मुक्काम नजरेच्या टप्प्यांत येतांच तो तुझ्या छातींत विश्वासघाताचा खंजीर खुपसून तुझा कांटा वाटेंतून दूर करील आणि आपला रस्ता साफ करून घेइल; चुकणार नाहीं. तेव्हां नको--आंधळेपणानें अशी फसूं नकोस. वेळींच सावध हो आणि आपला भावी अधःपात टाळ. या कांतारांचा तुला अनुभव नाहीं. हे पक्के बिलंदर भामटे आहेत.—

पद—भयो संध्याविन मन०—

**भरंवसा नको ॥ या चोरांचा ॥ धृ० ॥** चाल ॥ **वरिवरि प्रेमाचा दाखवीति देखावा ॥ परंतु अंतरिचा वेगळा खरा कावा ॥ जराहि खास नसे मानसासि ओलावा ॥** चाल ॥ **सारा नकली नखरा ॥ न खरा यांचा ॥ १ ॥** चाल ॥ **करोनि रंगढंग मांडिती लपंडावा ॥ अखंड करुणेचा करिति थोर कांगावा ॥ अखेर चिरुनि गळा साधिती पुरा दावा ॥** चाल ॥ **धंदा भोळ्या जगा ॥ ठकवायाचा ॥ २ ॥**

**काम०**—पण चंद्रकले, माझ्या तत्त्वाचा पुरस्कार करणाऱ्या कांतारसम्राटाला मी परकी अगर दुस्मान कां लेखावें ? रक्ताच्या नात्यापेक्षां तत्त्वाचें नातें अधिक निकटचें आणि श्रेष्ठ नाहीं काय ?

**भु०**—हां. या मुद्याला उत्तर द्या.–द्या–या मुद्याला उत्तर द्या.

**चंद्र**—कामलते, कांतारसम्राट् तुझ्या तत्त्वाचा खरा पुरस्कर्ता असता तर तूं त्याच्याशीं जोडलेले नातें मी आनंदानें मान्य केलें असतें व तत्त्वनिष्ठेसाठीं तुझ्या हातून घडत असलेला हा स्वदेशद्रोह मी निंद्य मानला नसता. परंतु कामलते, वस्तुस्थिति दुर्दैवानें तशी नाहीं. कांतारसम्राटाचें तत्त्वनिष्ठेचें हें नुसतें ढोंग आहे. त्याला तुझा देश घशांत घालावयाचा आहे आणि म्हणून तुला प्रिय असणारी तत्वनिष्ठेचीं गोंडस भाषा पोपटाप्रमाणें तुझ्यापुढें बोलून तो तुला फसवीत आहे.

**भु०**—खोटें–सपशेल खोटें–अजिबात खोटें. कांतारसम्राटाचें राणीसाहेबांवर अकृत्रिम प्रेम जडलेलें आहे. तेव्हां त्यांच्या हातून राणीसाहेबांशीं असें दगलबाजीचें वर्तन होणेंच शक्य नाहीं. प्रीति आणि विश्वासघात यांचा, माईसाहेब, नेहेमीं उभा दावा असतो.–उभा दावा.

**चंद्र०**—भुजंग, कांतरासम्राटाच्या अकृत्रिम प्रेमाचें कौतुक तुम्ही माझ्यापुढें सांगूं नका. त्याला स्वार्थापलीकडे जगांत कशाचीही किंमत वाटत नाहीं.

**भु०**—माईसाहेब, कांतारसम्राटाची निंदा म्हणजे राजद्रोह आहे, हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे.

**चंद्र०**— पण राजद्रोहापेक्षां सत्यद्रोह अधिक भयंकर आहे, हें तुम्हीही लक्षांत ठेवलें पाहिजे. सम्राटाच्या प्रेमाचा धिःकार करून कामलतेनें त्याचा केलेला अपमान त्याच्या अंतःकरणांत रात्रंदिवस शल्याप्रमाणें सलत असून कैरवांचें स्वातंत्र्य त्याच्या डोळ्यांना पहावत नाहीं, हें मला प्रत्यक्ष माहीत आहे. तेव्हां या गोष्टी कामलतेच्या कानावर घालून तिला आत्मघातापासून परावृत्त न केल्यास मी सत्यापासून च्युत झालें असें होऊन सत्यस्वरूप परमेश्वराच्या दरबारांत मी गुन्हेगार ठरेन आणि मला अंतीं रौरवगति प्राप्त होईल.

**भुजंग**—माईसाहेब, परमेश्वराचा दरबार मेल्यानंतरचा आहे. आतांचा नाहीं. आतां मानवी दरबार हाच परमेश्वराचा दरबार आहे. आणि आपण त्याचाच मान ठेवला पाहिजे.

**चंद्र०**—भुजंग, मानवी दरबाराला ईश्वरी दरबार मानण्यास मी साफ़

कबुल नाहीं व परमेश्वराच्या दरबारापुढें मानवांच्या दरबाराची मला काडी-इतकीही किंमत वाटत नाहीं. तेव्हां कामलते, सावध हो; ही पातकी तलवार फेंकून दे आणि शठाग्रणी कांतारसम्राटानें तुझ्याकरितां पसरलेल्या कपटजालांत पागलपणानें अशी उडी घेऊं नकोस. जा, आतां कांतारसम्राटाकडे जा व ही त्याची तलवार त्याला परत करून ताबडतोब स्वदेशाचा मार्ग धर. जा—हा ईश्वराचा तर नाहींच, पण माणसांचाहि दरबार नाहीं; हा साक्षात् सैतानाचा दरबार आहे, आणि येथें गुलामगिरीच्या रौरवावांचून तुझ्यासाठीं दुसरें कोणतेंही विश्रांतिचें स्थान नेमलेलें नाहीं. तेव्हां जा—एकदम येथून चालती हो व आपला जीव वांचीव.

**काम०**—तर मग माझ्या देशाच्या स्वातंत्र्याचें स्पष्ट आश्वासन कांतार-सम्राटाकडून मला मिळाल्यावांचून मी या तलवारीला स्पर्श करणार नाहीं. ही पहा—मी स्वतःच ही तलवार घेऊन अशीच्या अशी कांतारसम्राटाकडे जातें व ती त्याच्यापुढें फेंकून देऊन या सर्व गोष्टींचा साफ साफ उलगडा करून घेतें.

( जाऊं लागते ).

**भु०**—( तिला अडवून ) नाहीं—ताईसाहेब, मी आपल्याला असा भलताच अविचार करूं देणार नाहीं.

**काम०**—भुजंग, मला अडवूं नका. मला हे असे छक्केपंजे नको आहेत. मला सरळ खुला व्यवहार पाहिजे आहे. माझें पावित्र्य नष्ट करण्याची व माझ्या देशाचें स्वातंत्र्य हरण करण्याची दुष्ट वासना कांतारसम्राटाच्या मनांत जर गुप्तपणानें नांदत असेल तर त्यानें ती या वेळींच मला उघड करून दाखविली पाहिजे; नाहीं तर माझा विश्वासघात होणार नाहीं, असें स्पष्ट आश्वासन मला दिलें पाहिजे. त्यावांचून संशयानें पछाडलेल्या माझ्या मनाचें आतां समाधान होणार नाहीं.

**भु०**—सरकार, राजकन्येच्या भरमसाट थापांवर विश्वास ठेवून आपण सम्राटांच्या हेतूविषयीं नाहक शंका घेत आहांत !

**चंद्र०**—नाहक शंका घेत आहे ? भुजंग, केवळ तत्वनिष्ठेकरितांच मागचें सारें वैर विसरून मी तुला आश्रय देत आहे, असें हिला आश्रय देण्याच्या वेळीं अभिवचन दिलें असतांहि आज प्रेमाची भाषा सम्राटांच्या तोंडून विनादिक्कत निघूं लागली आहे ना ?

**काम०**—मग उद्यां तो आपला मतलब साधल्यावर माझ्या देशाच्या स्वातं-

त्याच्या अपहाराचीहि इच्छा प्रगट करण्याचें साहस करणार नाहीं, म्हणून कोणी सांगावें ? तेव्हां तें कांहीं नाहीं. सम्राटाच्या अंतःकरणांतील कपटाचा एकदां सुगावा लागल्यावर त्याचा पुरा छडा लावल्यावांचून पुढें पाऊल टाकण्यास मी साफ तयार नाहीं.—

पद्—मालकंस—त्रिताल-तराना.

**क्षण न धरिन पद् रणांगणिं शठहिता ॥ जरि अरिता । हरिल हिता । तुडविन तरि अजिता ॥ खलरिपु-असिता असद्रता ॥धृ०॥ अदय-हृदय बलमदांध पशुसा ॥ धरि हतबल-जन-हनन-लालसा ॥ ठेंचुनि टाकिन छेदिल जरि करिं । स्वर्ग-सुख-लता स्वतंत्रता ॥१॥**

( झटक्यानें निघून जाते ).

**भु०**—ताईसाहेब—ताईसाहेब--गेल्या--गेल्याच त्या ! माईसाहेब, काय--काय केलेंत हें ?

**चंद्र०**—करावयाचें तेंच केलें.

**भु०**—पण आपल्या या दीर्घ शहाणपणानें कांतारसम्राटांचें सारें राजकारण पार बिघडून जाईल !

**चंद्र०**—फार चांगलें होईल. स्वदेशाच्या दुस्मानांच्या तलवारीनें स्वदेशाची मान कापण्यास प्रवृत्त करणारें हें सैतानी राजकारण बिघडून मातीला मिळालें तर त्यांत जगाचें खास कल्याणच होईल.

**भुजंग**—जगाचें कल्याण केव्हां होईल तेव्हां होईल ! पण माझी आतां चांदी आटेल, त्याची वाट काय ?

**चंद्र०**—तुझ्यासारख्या महाविषारी कालसर्पाचें डोकें कायमचें ठेंचलें गेलें तर त्यांत मला आनंदच होईल.

**भुजंग**—कालसर्प ? कालसर्प मी ?-माईसाहेब, आपण माझ्यावर नेहेमीं अशी आग कां पाखडीत असता ?

**चंद्र०**—आग कां पाखडीत असता ? निमकहराम पाजी माणसा, लांब जीभ काढून हा प्रश्न विचारतांना तुला शरम नाहीं वाटत ? अरे, तुझ्यासारख्या अधमाधम चांडाळावर नुसती शब्दांचीच काय पण धगधगलेल्या अंगाराची आग पाखडून तींत तुला होरपळून-भाजून काढला, तरी तुझ्या अघोर पातकाबद्दल योग्य शिक्षा केल्याचें श्रेय पदरांत पडणार नाहीं. भुजंगा,—

पद—राधेकृष्ण बोल मुखसे०—

देशद्रोहि चोर। फितुरी॥ जे हरामखोर॥ खल ते। पातकी अघोर॥ धृ॥ दगलबाज दुष्माना॥ सन्मानें आणुनि सदना॥ स्वजनांच्या कांपिति माना॥ ऐसे बेइमान थोर॥ खल ते॥ १॥ विकट विकट परवशता॥ गळफांस आंवळुनि पुरता॥ ढळढळां रडाविती जनता॥ सैतान छल-कठोर॥ खल ते०—॥ २॥ बुडविती नरकिं स्वकुळा॥ धिःकार अशा चांडाळा॥ मुख नको पाहणें डोळां॥ भडके क्रोध-वन्हि घोर॥ खल ते०—॥ ३॥

( जाते ).

**भुजंग**—छे-हें प्रकरण फारच बेताल झालें! आतां याची गय करून उपयोगी नाहीं. नाहीं तर एखादे वेळीं चोर सुटून संन्याशाला सुळीं जाण्याची वेळ येईल. आतांपर्यंत मुलाजा राखला एवढा बस झाला. आतां तक्षकाच्या कानावर हा प्रकार घालून आपली मान वाचविण्याची तरतूद आपण करून ठेवलीच पाहिजे.

( जातो ).

---

## प्रवेश २ रा.



( उद्दाम केतूचा महाल. उद्दामकेतू व तक्षक ).

**उद्दाम०**—नाहीं-शक्य नाहीं. चंद्रकलेच्या हातून असा भयंकर प्रमाद घडणें बिल्कुल शक्य नाहीं. फाजील सात्विक स्वभावामुळें आमचें कुटिल राजकारण तिला पटत नाहीं आणि त्याबद्दल तिचे आमचे वारंवार खटके उडतात, हें खरें असलें तरी आमच्या जाळ्यांत सांपडलेल्या आमच्या कट्या दुस्माननीला असा फंदफितूर देऊन ती आमच्या कारस्थानांत अशी भलतीच ढवळाढवळ करील, असें आम्हाला वाटत नाहीं. तक्षक, हा भुजंग महापाताळयंत्री माणूस आहे. तो कोणत्या वेळीं कुठें आणि कशी आग लावील, याचा कांहीं नेम नाहीं. तेव्हां त्याचा प्रत्येक शद्ब ग्रहण करतांना फार खबरदारी ठेवली पाहिजे.

**तक्षक**—सरकारांचें म्हणणें बरोबर आहे. भुजंग खरोखरच महा आगलाव्या आहे. परंतु. या बाबतींत त्याची कांहीं लबाडी असेल असें निदान मला तरी वाटत नाहीं.

**उद्दाम॰**—तर मग त्याला आमच्यापुढें हजर करा आणि चंद्रकलेला ताबडतोब इकडे घेऊन या. ही तलवार आमच्या पुढें फेंकून आमच्या उत्तराचीही वाट न पहातां कामलता उद्धटपणानें चालती झाल्यामुळें आमचें डोकें संतापानें अगदीं भडकून गेलें आहे. तें या प्रकरणाचा पुरा तपास लावून गुन्हेगाराला कडक शासन केल्याशिवाय शांत होणार नाहीं. जा–भुजंगाला आंत पाठवून तुम्ही स्वतः चंद्रकलेला ताबडतोब इकडे घेऊन या. ( तक्षक जातो ). तक्षक म्हणतो हें खरें असेल, का चंद्रकला या सर्वांचा तिरस्कार व धिःकार करते, म्हणून यांनीं तिच्याविरुद्ध हें खोटेंच कवटाळ उभें केलें असेल? हो. कांहीं नेम नाहीं. हे सारे हरामखोर खात्रीनें इतके पाजी आहेत. ते कोणावरही कांहींही तोहोमत आणावयाला केव्हांही मागें पुढें पाहणार नाहींत; आणि त्यांतही ही तक्षक-भुजंगांची जोडी म्हणजे तर साक्षात् कालकूटाचा अर्कच आहे. अंगाला चाटून जाणाऱ्या वाऱ्याच्या एखाद्या नाजुक लहरीनेंसुद्धां एखाद्याच्या घरादाराची साफ राख-रांगोळी करून टाकतील. तेव्हां यांच्या संबंधानें जरा सावधच असलें पाहिजे.

( भुजंग येतो ).

**भु॰**—सरकारांचा जयजयकार असो !

**उद्दाम॰**—कोण? भुजंग?

**भु॰**—होय. सरकारांच्या चरणांचा दासानुदास.

**उद्दाम॰**—भुजंग, चंद्रकलेसंबंधानें तक्षकाजवळ तूं सांगितलेल्या गोष्टी खऱ्या आहेत का?

**भु॰**—अक्षरशः खऱ्या आहेत, सरकार.

**उद्दाम॰**—पुराव्यानें शाबीत करून देशील?

**भु॰**—अलबत् करून देईन.

**उद्दाम॰**—चंद्रकला तुझ्यासारखी सैतानाची बदजात अवलाद नसून या कांतार सम्राटाची साक्षात् मुलगी आहे, हें तुला माहित आहे कीं नाहीं?

**भु॰**—सरकार, जी गोष्ट अलम दुनियेला माहित आहे, ती मला कशी माहित नसेल?

**उद्दाम॰**—आणि इतकें असूनसुद्धां आपल्या विषारी दांतानें तिला कड-कडून चावा घेण्याचें धाडस करीत आहेस! तेव्हां याचा काय परिणाम होईल, याकडे नीट लक्ष ठेवून मग काय बोलावयाचें तें बोल.

**भु०**—होय. याकडे लक्ष ठेवूनच मी बोलत आहे.

**उद्दाम०**—ठीक आहे. तर मग आतां सांभाळून ऐस. तूं भुजंग असलास तर हा उद्दामकेतु महाभुजंग-नव्हे-नव्हे-कालभुजंग आहे. याच्याशीं निमकहरामी केलीस तर हें तुझें विषारी मस्तक त्याच्या लाथेच्या ठोंकरीखालीं ठेंचलें जाईल, खूप लक्षांत ठेव.

( तक्षक व चंद्रकला प्रवेश करतात ).

**तक्षक**—सरकार, माईसाहेब आल्या.

**उद्दाम०**—चंद्रकले, अशी इकडे येऊन बैस; आणि आम्ही विचारतों त्या प्रश्नांचीं सरळ आणि खरीं उत्तरें दे.

**चंद्र०**—(बसून) बाबा, वांकडे आणि खोटें बोलण्याची मला संवय नाहीं. मी खरें तेंच सरळ सांगेन. विचारावें काय असेल तें.

**उद्दाम०**—चंद्रकले, या वेळीं तूं आपल्या प्रेमळ पित्यापुढें नसून न्याय-निष्ठुर कांतारसाम्राटापुढें आहेस हें लक्षांत ठेव.

**चंद्र०**—सत्याचा सरळ उच्चार करतांना कांतारसाम्राटाचेंचि काय,पण प्रत्यक्ष विश्वसम्राटाची सुद्धां मला भीति वाटत नाहीं.

**उद्दाम०**—तर मग तूं राजद्रोह आरंभिला आहेस, असा या भुजंगाचा तुझ्या-वर आरोप आहे. तो खरा आहे का? बोल.

**चंद्र०**—राजद्रोह?

**उद्दाम०**—होय-राजद्रोह!

**चंद्र०**—राजद्रोह काय वस्तु आहे, हेंच मला माहीत नाहीं. मी फक्त देव-द्रोह कानांनीं ऐकला आहे. आणि तो माझ्या हातून झालेला नाहीं हें मी महा-राजांना खात्रीपूर्वक सांगू शकतें.

**उद्दाम०**—असलें लटपटीचें उत्तर नको आहे आम्हाला!

**चंद्र०**-यांत लटपट कांहींच नाहीं. राजद्रोह कशाला म्हणतात, हें परमेश्वर साक्ष खरोखरच मला माहित नाहीं.

**भु०**-माहीत नाहीं?

**चंद्र०**-नाहीं, माहीत नाहीं!

**भु०**-माईसाहेब, ही सम्राटांची तलवार सम्राटांना परत करण्याविषयीं

आपण राणी कामलतेला सांगितलेंत कीं नाहीं? बोला—खरें बोला—अगदीं परमेश्वरसाक्ष खरें बोला. सांगितलेंत कीं नाहीं?

**चंद्र०**—होय, सांगितलें.

**उद्दाम०**—काय? सांगितलेंस?

**चंद्र०**—होय. सांगितलें.

**उद्दाम०**—कां सांगितलेंस?

**चंद्र०**—महाराज, दनिदुर्बलांच्या रक्तानें माखलेल्या या सैतानी तलवारीनें स्वदेशाची मान कापणें ह्मणजे अघोर पातक आहे, असें मला वाटतें ह्मणून सांगितलें.

**उद्दाम०**—तुला हें अघोर पातक वाटतें तर तूं या तलवारीकडे ढुंकूनही पहावयाचें नव्हतेंस. पण कामलतेला असा फंद देण्याचें तुला कारण काय?

**चंद्र०**—महाराज, विश्वासानें आपला आश्रय करणाऱ्या अनाथांना सत्यासत्यविवेक सांगून सन्मार्गाला लावणें, हा प्रत्येकाचा धर्मच आहे.

**उद्दाम०**—पण कामलता कांहीं तुझ्या आश्रयाला येऊन राहिलेली नाहीं—आमच्या आश्रयाला येऊन राहिलेली आहे! तेव्हां तिला सत्यासत्यविवेक सांगून सन्मार्गाला लावण्याची जबाबदारी आमच्या शिरावर आहे. तुझ्या शिरावर नाहीं.

**चंद्र०**—पण महाराज, आपण ही जबाबदारी ओळखीत नाहीं. आपण त्या बिचाऱ्या भोळ्या अजाण अबलेला असत्याची शिकवण देऊन कुमार्गाला लावीत आहांत!

**उद्दाम०**—कुमार्गाला लावीत आहोंत? खुळे पोरी, हें राजकारण आहे, हें तुला समजत नाहीं?

**चंद्र०**—समजतें—चांगलें समजतें. पण राजकाणांत सच्चेपणाचा खूनच पडला पाहिजे, असें कांहीं शास्त्र नाहीं.

**तक्षक०**—माईसाहेब, राजकारणांत सच्चेपणा आणि लुच्चेपणा असा भेदच नाहीं.

**भु०**—येथें साराच सच्चेपणा—सारेंच सत्य! सब घोडे बारा टक्के!

**चंद्र०**—तक्षक, आपल्या राजकारणांत हा भेद नसेल व नाहीं हें मी पूर्ण जाणतें. पण तक्षक, आपलें राजकारण हें खरें राजकारण नसून हा शुद्ध चोरदरवडेखोरांचा धंदा आहे!

**उद्दाम०**–काय ? चोर दरवडेखोरांचा धंदा आहे ?

**चंद्र०**–होय. चोरदरवडेखोरांचाच नव्हे तर खुनी मारेकऱ्यांचा धंदा आहे.

**तक्षक**–माईसाहेब–माईसाहेब, काय–काय बोलत आहांत आपण हें ?

**चंद्र०**–सत्य-निर्मळ सत्य-निरपेक्ष सत्य मी बोलत आहे. आपल्या पाशवी सामर्थ्याच्या जोरावर जुलुमानें व जबरदस्तीनें दीन दुर्बलांच्या सर्वस्वाचा अपहार करून त्यांच्या रक्तानें आपलें सर्वांग माखून काढणाऱ्या नरराक्षसांना चोरदरवडे-खोर-खुनी मारेकरी म्हणणें म्हणजे सुद्धां त्यांचा गौरव करण्यासारखेंच आहे. तक्षक,—

पद—पतित पावना०—

**अबल-तारणा ।। बाहु-बल रणा ।। देइ देव नरा जाणा ।। ध्रु० ॥ परि स्वार्थि जो । जग जाळितो ॥ नर-राक्षसा त्या अधमा ॥ चिर वास नरकीं जाणा ॥ १ ॥**

**उद्दाम०**–बेताल पोरी, हें पांडित्य तूं कोणाला शिकवीत आहेस, याची तुला कांहीं शुद्ध आहे का ?

**चंद्र०**–सत्याचा उच्चार करतांना ही शुद्ध ठेवण्याचें कारण नाहीं. सत्य हें नितांत निर्भय आहे आणि तें वाणीवाटें प्रगट होतांना प्रत्यक्ष कृतान्त काळाचीही पर्वा बाळगीत नाहीं.

**उद्दाम०**—तर मग तुझ्या या बंडखोर वाणीला अडसर घालून हें नितांत निर्भय सत्य आम्हाला कायमचें जमिनींत गाडून टाकिलें पाहिजे.

**चंद्र०**—खुशाल–अगदीं खुशाल गाडून टाका. सत्य हें सप्तपाताळाच्या तळाशा जरी दडपलें तरी तेथूनसुद्धां आपल्या घनगंभीर गर्जनेनें सारा ब्रह्मांड-गोल हादरून टाकल्याशिवाय राहणार नाहीं.

**उद्दाम०**—सत्य काय करील तें आम्ही पाहून घेऊं. पण तूं मात्र यापुढें आमच्या या तलवारीची कामलतेजवळ नेहेमीं तरफदारीच केली पाहिजे, असा आमचा तुला सक्त हुकुम आहे.

**चंद्र०**—या तलवारीची तरफदारी ?

**उद्दाम०**—हो–हो–या तलवारीची तरफदारी !

**चंद्र०**—नाहीं. महाराज, या धडावर हें मस्तक कायम आहे तोंवर हिच्या तरफदारीचा एक शब्दही या चंद्रकलेच्या वाणीवाटें निघणार नाहीं. या जिव्हेंत

शद्वोच्चाराची शक्ति असेल तोंवर या आपल्या तलवारीचा मी सदैव धिःकारच करीत राहीन आणि हिचे तुकडे तुकडे होऊन ही धुळीला मिळावी म्हणून परमेश्वरापाशीं सदासर्वकाल करुणा भाकीत राहीन.

**उद्दाम०**—तर मग तक्षक, या तलवारीची तरफदारी हिच्या तोंडून निघेपर्यंत हिच्या हालचालीवर सक्त नजर ठेवा आणि कामलतेची व हिची भेट होऊं देऊं नका. लढाईचा पुकारा होईपर्यंत हिची आणि कामलतेची गांठ पडली, तर हिच्या ऐवजीं, तक्षक, प्रथम तुमची गर्दन मारली जाईल, लक्षांत ठेवा. चला, घेऊन चला हिला येथून. यापुढें या कार्टीचें हें काळें तोंड पाहण्याची आमची बिल्कुल इच्छा नाहीं.

**चंद्र०**—बाबा, माझें काळें तोंड यापुढें आपण पाहिलें नाहीं तरी मला त्याची फारशी फिकीर वाटत नाहीं. परंतु परमेश्वराच्या दरबारांत आपलें तोंड काळें होणार नाहीं, याची मात्र आपण जरूर फिकीर ठेवा, अशी माझी आपल्या चरणांशीं प्रार्थना आहे. परमेश्वराच्या दरबारांत नरभक्षक राक्षसांकरितां दया नाहीं—दंड आहे. आणि तोही भयंकर दंड आहे.

**उद्दाम०**—माथेफिरू धर्मवेड्यांच्या सडक्या मेंदूवांचून ज्याचें नुसतें आस्तित्वसुद्धां जगांत कुठें प्रत्ययाला येत नाहीं, त्याच्या दरबारांतील दंडाचें भय आम्हांला दाखवूं नकोस. त्याचा दंड केवढाही भयंकर असला तरी उद्दामकेतूची तलवार जगांतील झाडून साऱ्या दुर्बलांना व अनाथांना आपले गुलाम केल्याशिवाय रहाणार नाहीं. पोरी या उद्दामकेतूची तलवार जगाच्या मैदानांत स्वैरपणानें संचार करीत आहे, तोंवर दुर्बलांना व अनाथांना कोणी पाठीराखा मिळेल, अशी आशा करणें व्यर्थ आहे.

**चंद्र०**—बाबा, ही आपली भूल आहे.—

पद—ताराया दीन अबला या०

**परमात्मा वालि पतितांचा ।। परम करुण । अति कृपाल । प्रणतपाल ।। कुजनां काल-काल साचा ॥ धृ० ॥ अनय-लवहि निरखितांची त्याचा ।। सज्ज सबल कर सत्य-पालनीं ॥ दमुनि अनल-छलका खला ॥ त्वरित वारि सारा । भार पातकांचा॥१॥**

**उद्दाम०**—बस्. पुरे कर तुझें पांडित्य. तक्षक, घेऊन चला हिला. ( तक्षक चंद्रकलेस घेऊन जातो ). भुजंग, तुमच्याबद्दल नाहक संशय घेऊन तुम्हांला दुरुत्तरांनीं ताडण केल्याबद्दल आम्हांला फार वाईट वाटतें.

**भु०**—वाईट वाटण्याचें कारण काय ? सरकारांचें मन साफ झालें हें पाहून या दासाला फार धन्यता वाटते.

**उद्दाम०**—चला. आमच्याबरोबर कामलतेकडे चला. ती मागेल तें आश्वासन देऊन आम्हाला तिची समजूत आतां घातलीच पाहिजे. नाहींतर तडजोड हाणून पाडण्याचा आमचा डाव फसून आनंदखंडांत महायुद्धाच्या ज्वाला भडकवून सर्वत्र कांतार साम्राज्यसत्ता प्रस्थापित करण्याची आमची महत्वाकांक्षा जागच्याजागींच पार जिरून जाईल. तेव्हां ही तिनें परत केलेली तलवार कसेंही करून फिरून तिच्या कमरेला लटकावेण्याच्या कामीं आह्मांला तुमची मदत पाहिजे.

**भु०**—जशी सरकारांची इच्छा ! दास सेवेला हजर आहे. ( उद्दामकेतू जातो ). अखेर अडल्या नारायणानें गाढवाचे पाय धरलेच ! ( भुजंग जातो ).

---

## प्रवेश ३ रा.



( श्रीमज्जगद्‌गुरु श्री धर्मानंद यांचा मठ. धर्मानंद, सुरेंद्र, कल्पलता, दाक्षिणात्य राजमंडळांतील राजे, इतर धर्मगुरु, संन्यासी इ. इ. ).

**सुरेंद्र**—उद्दामकेतूनें कांहीं तडजोडीचा मार्ग सुचविला आहे का ?

**धर्मानंद**—छे ! तो कसला तडजोडीचा मार्ग सुचवितो ? तडजोडीच्या नांवाखालीं तो तुम्हांला शरणागति पत्करण्यास सांगणार आणि ती तुम्ही पत्करली नाहीं म्हणजे समेट मोडल्याचें खापर तुमच्या डोक्यावर फोडून तुमच्याविरुद्ध युद्ध पुकारणार. यापलीकडे या तडजोडीच्या खटाटोपांत कांहींही निष्पन्न व्हावयाचें नाहीं.

**कल्प०**—आम्ही त्या अपेक्षेनेंच येथें आलों आहोंत. कामलता एकाकी असती तर कदाचित् निराशेनें तिनें आपला हट्ट सोडला असता. परंतु कांतारसम्राट् तिच्या पाठीशीं युद्धाची लालसा धरून उभा आहे. तो तिला समेटाची कोणतीही शर्त मान्य करूं देणार नाहीं, हें अगदीं निश्चित आहे. ( सेवक प्र. क. ).

**सेवक**—कांतारसम्राट् उद्दामकेतु व राजकन्या कामलता यांच्या स्वाऱ्या आल्या आहेत. आज्ञा होईल तर त्यांना आंत आणतों.

**धर्मा०**— आण त्यांना आंत. ( उद्दाम०, काम०, भुजंग व तक्षक प्र. क. )

उद्दामकेतु व कामलते, तुमचें स्वागत असो ! या. या आसनांवर विराजमान व्हा. तुमचें कुशल आहे ना?

**उद्दाम०**—स्वामींच्या कृपेनें आम्ही सव आनंदांत आहोंत. स्वामींचें धर्मकार्य निर्विघ्नपणें चाललें आहे ना?

**धर्मा०**—परमात्म्याच्या कृपेनें धर्मसत्ता उत्तरोत्तर उत्कर्ष पावत आहे.

**उद्दाम०**—आनंद होतो हें ऐकून. धर्मसत्तेचा उत्कर्ष म्हणजे मानवजातींच्या सुखाचा विकास. तेव्हां तो सर्वांनाच इष्ट व प्रिय आहे. पण तडजोडीसंबंधानें आचार्यांनीं काय विचार केला आहे?

**धर्म०**—त्यासाठींच आम्ही तुम्हाला येथें समक्ष पाचारण केलेलें आहे. राणी कल्पलता, तिच्या पक्षाची प्रमुख मंडळी आणि दाक्षिणात्य राजमंडळांतील भूपाल, हे येथें आलेले आहेत. तेव्हां उभय पक्षांनीं मोकळ्या मनानें विचार-विनिमय करून तडजोडीनें या भांडणाचा निकाल लावून टाकावा, अशी आमची इच्छा आहे.

**उद्दाम०**—आणि आमचीही अशीच इच्छा आहे. आजच्या बैठकींत हें भांडण मिटवून टाकून कामलता आणि कल्पलता यांचा समेट घडवून आणल्या-वांचून येथून हालावयाचें नाहीं, असा आम्हीहि निश्चय केला आहे. आचार्य, काय सांगूं आपणाला? मला रक्तपाताचा आणि मनुष्यसंहाराचा जात्याच इतका तिटकारा आहे कीं अगदीं निकरावर प्रसंग आल्याखेरीज मी आपल्या तलवारीचा बंद ढिला करीत नाहीं; आणि नंतर सुद्धां तलवार पुनः म्यान केव्हां करीन, असें मला होऊन जातें!

**१ राजा**—तर मग कैरवावर स्वारी करण्याचा आपला बेत अद्यापि नक्की झालेला नाहीं?

**उद्दाम०**—बिलकुल नाहीं. कैरव राजसिंहासनाचा मार्ग कामलतेला मोकळा करून देण्यांत आल्यास कैरवावरील स्वारीचा बेत या क्षणीं सोडून देण्यास आम्ही तयार आहोंत.

**कल्प०**—कैरव राजसिंहासनाचा मार्ग कामलतेला केव्हांही खुलाच आहे!

**काम०**—खुला आहे? कोण म्हणतें खुला आहे?

**सुरेंद्र**—आम्ही म्हणतों खुला आहे! कैरव प्रजाजनांची आराधना करून त्यांना सुप्रसन्न करून घेतल्यावर आपल्या मार्गांत आड येण्याची कोणाची प्राज्ञा आहे?

**काम०**—अस्सें ! कैरव राजसिंहासनाचा मार्ग मला खुला आहे तो हा असा खुला आहे ! वा ! कैरवाध्यक्ष, आपल्या साळसूदपणाची तारीफ करावी तेवढी थोडीच आहे ! पण लावून मुलीला स्वयंवराचा हक्क बहाल करण्यांतलाच हा प्रकार आहे. पण स्वयंवराच्या नांवाखालीं पणाची गुलामगिरी पत्करण्याइतकी मी खुळी नाहीं. मला राज्य मिळालें नाहीं तरी चालेल. पण कैरवप्रजाजनांची आराधना करून त्यांच्या हाताच्या आधारानें कैरव राजसिंहासनाची पायरी चढण्यास ही कामलता प्राणांतींही कबूल होणार नाहीं. कैरवराजसिंहासन माझें आहे आणि लोकनिर्णयाचा पण जिंकल्यावांचूनच तें मला प्राप्त झालें पाहिजे.

**कल्प०**—तें कालत्रयीं शक्य नाहीं. निदान ही कल्पलता जिवंत असेपर्यंत तरी तूं ही आशा केव्हांही करूं नकोस. उकिरड्यावर लोळणाऱ्या एखाद्या श्वानाला जरी कैरव प्रजाजनांनीं आपला ‘राजा,’ म्हणून पसंत केलें तरी त्याच्या मस्तकावर सुद्धां मी हा कैरव राजमुगुट मोठ्या आनंदानें ठेवीन. पण लोकांच्या संमतीवांचून कैरवराजसिंहासावर आरूढ होण्याचा हांव धरून साक्षात् इन्द्र जरी स्वर्गांतून भूतलावर अवतरला तरी त्याच्या मस्तकावर सुद्धां मी हा कैरवराजमुगुट स्वतः ठेवणार नाहीं व इतरांनाही ठेवूं देणार नाहीं.

**उद्दाम०**—असाच तुझा हट्ट असेल तर समेट होणें केव्हांही शक्य नाहीं.

**सुरेंद्र**—आणि समेट म्हणजे शरणागति असेल, तर असला अपमानास्पद समेट आम्हालाही नको आहे.

**धर्मा०**—थोडे शांत व्हा–एकदम असे वर्दळीवर येऊं नका. आपण या ठिकाणीं भांडण भांडण्यासाठीं एकत्र झालों नसून भांडण मिटविण्यासाठीं एकत्र झालों आहोंत. तेव्हां अशा प्रसंगीं प्रत्येक पक्षानें शांत वृत्तीच धारण केली पाहिजे.

**संन्यासी**—उद्दामकेतु माहराज, राज्याचा अर्धा वाटा कामलतेला दिल्यास त्याला तुमची कांहीं हरकत आहे?

**उद्दाम०**—हा सवाल कामलतेला करणें अधिक युक्त होईल. मी काय–तिऱ्हाईत मनुष्य ! भांडणारे दोन्ही पक्ष ज्या गोष्टीला राजी होतील, ती गोष्ट मला केव्हांही मान्यच होईल !

**१ राजा**—ताईसाहेब, ही सूचना आपणाला कितपत पसंत आहे ?

**काम०**—मुळींच पसंत नाहीं–संपूर्ण कैरवराज्य माझ्या मालकीचें आहे व मला तें सर्व मिळालें पाहिजे. अर्ध्या वांट्यावर मी संतुष्ट होणार नाहीं.

**धर्मा०**—कामलते, असा भलताच हट्ट धरून हातचें सोडून पळत्याच्या पाठीस लागूं नकोस. त्यांत कांहीं फायदा नाहीं. मिळत आहे तें मुकाट्यानें घे, नाहींतर तुला कांहींच मिळावयाचें नाहीं.

**काम०**—पर्वा नाहीं. मिळालें तर सर्वच मिळालें पाहिजे-नाहीं तर मला कांहींच नको.

**सुरेंद्र०**—तर मग सुईच्या अग्रावर मावेल एवढा मातीचा कणही तुला मिळणार नाहीं.

**काम०**—मिळेल किंवा नाहीं याचा निकाल लावण्यास उद्दामकेतु यांची तलवार समर्थ आहे.

**उद्दाम०**—होय-या प्रकरणाचा आपसांत निकाल न लागला तर उद्दामकेतूच्या तलवारीला निरुपायास्तव मध्यें पडणें भागच आहे.

**सुरेंद्र**-आपल्या तलवारीला भिऊन कैरव आपल्या स्वयंनिर्णयाच्या हक्कावर पाणी सोडण्यास तयार होतील असें समजूं नका.

**उद्दाम०**—तर मग आचार्य, कैरवावर स्वारी करण्यावांचून आम्हाला उपायच राहिलेला नाहीं.

**धर्मा०**—नाहीं. मला वाटतें तुझ्या हातून हा मोठा प्रमाद घडत आहे.

**उद्दाम०**—माझ्या हातून प्रमाद घडत आहे असें जर आचार्यांना वाटत असेल, तर तो घडूं नये म्हणून आचार्यांनीं कैरवांना नमतें घेण्याचा उपदेश करावा.

**धर्मा०**—कैरवांना नमतें घेण्याचा उपदेश आम्ही कसा करणार ? त्यांचा पक्ष न्यायाचा, सत्याचा व धर्माचा आहे; आणि न्यायाला अन्यायापुढें, सत्याला असत्यापुढें आणि धर्माला अधर्मापुढें मान वांकविण्यास सांगणें म्हणजे धर्माची, धर्मसिंहासनाची आणि धर्माचार्यांची अधोगति आहे.

**काम०**—तर मग आमचा पक्ष अन्यायाचा, असत्याचा व अधर्माचा आहे, असाच आचार्यांचा अभिप्राय दिसतो !

**धर्मा०**—त्याबद्दल आमच्या मनाला तिळमात्रही शंका नाहीं. कैरव प्रजाजनांच्या स्वातंत्र्यावर तुम्ही हा धडधडीत दरवडा घालीत आहांत-त्यांच्या जन्मसिद्ध हक्कांची पायमल्ली करीत आहांत !

**काम०**—राजा निवडणें हा कांहीं प्रजांचा जन्मसिद्ध हक्क नाहीं. राजा हा ईश्वरनिर्मित आहे. तो कोणाकडून निवडला जात नाहीं व त्याला कोणी निवडूं शकत नाहीं.

**धर्मा०**—पण राजाप्रमाणें प्रजासुद्धां ईश्वरनिर्मितच आहेत. राजे आजपर्यंत ईश्वरनिर्मितपणाचा हक्क उपभोगीत होते, तो केवळ प्रजांच्या मूक संमतीनेंच उपभोगीत होते. प्रजांची मूक संमति नसती तर ईश्वरनिर्मितपणाच्या हक्कावर राजसिंहासनांचा उपभोग राजांना एक क्षणभरही घेतां आला नसता.

**सुरेंद्र**—शिवाय कैरवेश्वरानें हा हक्क आपखुषीनें प्रजांना बहालही केला होता.

**काम०**—पण कैरवेश्वराला हा हक्क प्रजांना बहाल करण्याचा अधिकारच काय होता ? कैरव राज्य कांहीं कैरवेश्वरानें स्वपराक्रमानें संपादन केलेलें नव्हतें.

**धर्मा०**—नसेल. परंतु प्रजांचे जन्मसिद्ध हक्क प्रजांना बहाल करण्याचा प्रत्येक राजाला अधिकार आहे. नव्हे-तो प्रत्येक राजाचा परमपवित्र धर्म आहे.

**काम०**—मी हा धर्म ओळखीत नाहीं.-

**सुरेंद्र**—तर मग आम्हीही आपल्याला ओळखीत नाहीं.

**उद्दाम०**—ओळखीत नाहीं ? काय मजाल आहे ओळखीत नाहीं ? उद्दामकेतूची तलवार तुमच्या डोळ्यावर चढलेली धुंदी झाडून टाकून तुम्हाला कामलतेची ओळख पटवून दिल्याशिवाय रहाणार नाहीं.

**धर्मा०**—नाहीं-उद्दामकेतु, नाहीं. भलत्याच दुराग्रहाला पेटून रक्तपाताला व मनुष्यसंहाराला उद्युक्त होणें, हा तुझ्यासारख्या समर्थाचा आचार नाहीं-धर्म नाहीं.

**उद्दाम०**—आचार्य, म्हातारी मेल्याचें दुःख नाहीं पण काळ सोकावतो, त्याला जपलेंच पाहिजे. राजांच्या कपाळीं प्रजांची गुलामगिरी मारून त्यांच्या ईश्वरदत्त हक्कांची पायमल्ली करणारें हें पाखंड मत कैरवाची सीमा ओलांडून सर्वत्र स्वैर संचार करूं लागलें, तर सांप्रत पृथ्वीवर नांदत असलेल्या सर्व राजकुलांचा समूळ उच्छेद होऊन सर्वत्र एकच हाहाःकार माजेल. तेव्हां अखिल राजवंशाच्या मूळावर घाव घालणारें हें अमानुष तत्त्व भूगर्भाचें आच्छादन फोडून दाही दिशांनीं आपल्या शाखांनीं फोंफावूं लागलें नाहीं, तोंच त्याचा मूळांतच नाश करणें मला अवश्य आहे. हा झगडा केवळ दोन व्यक्तींमधील लढ्याच्या स्वरूपाचा असता तर मी त्याकडे ढुंकूनही पाहिलें नसतें.

पण हा दोन तत्त्वांचा झगडा आहे; आणि ज्या तत्त्वाचा मी अभिमानी आहें, त्याच्या संरक्षणार्थ मला माझी तलवार म्यानांतून बाहेर काढण्याशिवाय उपायच राहिलेला नाहीं.

**कल्प०**—तत्त्वाभिमानाचें हें तुमचें नुसतें ढोंग आहे. हा झगडा केवळ खासगी स्वरूपाचा असता तरी देखील संधि साधून तुम्ही या भांडणांत आपला हात खात्रीनें शिरकविलाच असतात !

**उद्दाम०**—कशासाठीं ? हा नसता उपद्व्याप करण्यापासून आम्हाला काय फायदा होता ?

**कल्प०**—कशासाठीं ? काय फायदा होता ? उद्दामकेतु महाराज, आपल्या या निरपेक्षपणाच्या कांगाव्याचा अर्थ न कळण्याइतके आम्ही मूर्ख आहोंत, असें समजूं नका. दाक्षिणेकडील दुर्बल राष्ट्रें आज कित्येक वर्षें तुमच्या डोळ्यांत खड्यासारखीं खुपत आहेत आणि कांहीं तरी निमित्तानें त्यांना युद्धांत खेंचून, तुडवून टाकण्याचा तुमचा इरादा महशूर आहे.

**उद्दाम०**—तुझा माझ्यावर हा मिथ्यारोप आहे. दाक्षिणेकडील राष्ट्रांच्या नाशाची बुद्धि आमच्या चित्तांत आजवर कधीं नांदलेली नाहीं आणि आजही ती नांदत नाहीं. इतकेंच नव्हे तर आजसुद्धां मी जो कैरवावर हत्यार उपसण्यास तयार झालों आहें तो सुद्धां कैरवांचा नाश करावा म्हणून तयार झालों नाहीं. तर या पाखंड मताचा समूळ उच्छेद करावा, म्हणून तयार झालों आहें. कैरव जर या मताचा त्याग करून कामलतेचा परंपरेनें सिद्ध असलेला हक्क मान्य करण्यास तयार होतील, तर या क्षणीं हत्यार खालीं ठेवण्यास आमची तयारी आहे.

**सुरेंद्र**—नाहीं. कैरवाकडून ही शर्त केव्हांही मान्य केली जाणार नाहीं. राजा व प्रजा यांच्यामधील संबंध कैरव राष्ट्रांतील थोर पुरुषांनीं निश्चित करून टाकले आहेत; आणि तेच यापुढें कायम राहिले पाहिजेत परंपरेच्या हक्कानें कामलतेच्या मस्तकावर कैरव राजमुकुटाची स्थापना करणें म्हणजे आपण माणसें नसून जनावरें आहोंत, अशी कैरवांनीं कबुली देण्यासारखें आहे. इतर देशांतील लोकांना आपली गणना जनावरांच्या कोटींत करून घेण्यांत भूषण वाटत असेल. पण कैरवांना तें भूषण वाटत नाहीं.

**काम०**—खोटी-साफ खोटी गोष्ट. आपण बडबडत आहांत यांतील एक अक्ष-

रही कैरवांना मान्य नाहीं. आज पिढ्यानुपिढ्या प्रजा ज्या मार्गानें चालत आल्या आहेत, त्या तो एकाएकीं कशा सोडतील? तुम्हा स्वार्थलंपट चोरांचेंच हें सारें कारस्थान आहे. मला कैरव राजसिंहासनाची प्राप्ति होऊं नये, अशी तुमची सर्वांची इच्छा आहे आणि म्हणून तुम्ही सर्वांनीं लोकनिर्णयाचें हें थोतांड उभें केलें आहे. लोकांचा त्याच्याशीं काडीइतकाही संबंध नाहीं. तुम्ही जर हा नसता घोटाळा देशांत माजविला नसता, तर कैरवेश्वरानें ही बाब लोकनिर्णयावर केव्हांही अवलंबून ठेविली नसती आणि लोकांनीही माझ्या जन्मसिद्ध हक्काला धक्का पोहों-चविण्याचें साहस केलें नसतें.

**कल्प०**—असेंच असेल तर हा घे—हा मुगुट मी आचार्यांच्या पायांवर अर्पण करतें. तू अशीच्या अशी देशांत जा आणि लोकांचा यत्किंचितही अडथळा न होतां सहजासहजीं कैरव राजसिंहासनाचा कबजा तुला घेतां आला तर तो घेऊन या मुगुटावर आपला हक्क शाबीत कर. तुझ्या मार्गांत कोणत्याही प्रकारचें विघ्न उपस्थित होऊं नये, म्हणून आम्ही सारे स्वार्थलंपट चोर आचार्यांच्या मठांत—आचार्यांच्या पहाऱ्यांत नजरकैद्याप्रमाणें रहाण्यास तयार आहोंत. हा घे—हा मुगुट मी काढून ठेवला. ( तसें करते ). एकटी जा वाटल्यास उद्दामकेतु महाराजांना बरोबर घेऊन जा—वाटल्यास स्वसंरक्षणापुरतें सैन्य बरोबर ने—माझी मुळींच हर-कत नाहीं.

**सुरेंद्र**—जा—जा—स्वयंनिर्णय हें आम्ही उभारलेलें थोतांड आहे का हा लोकमताचाच परिणाम आहे, याबद्दल आपली खात्री करून घेऊन उद्दामकेतु महाराजांचाही भ्रम दूर कर. जा—या क्षणीं लोकमत अजमावण्यासाठीं जा.

**काम०**—नाहीं. हा मुगुट मस्तकावर धारण केल्याशिवाय अशा रीतीनें लोकमत अजमावण्यासाठीं मी कैरवांत पाऊल टाकणार नाहीं. मला पहिल्यांदा राजमुगुट पाहिजे आहे—लोकमत नको आहे. राज्यारूढ झाल्यावर मी लोकमताचा हवा तेवढा गौरव करीन—अगोदर करणार नाहीं.

**उद्दाम०**—बरोबर आहे. अशा रीतीनें लोकमत अजमावणें म्हणजे आपल्या जन्मसिद्ध हक्कावर तिलांजलि देण्यासारखें आहे. तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें हें कदाचित् तुम्ही उभारलेलें थोतांड नसेलही. परंतु तें कोणीही उभारलेलें असलें तरी एक थोतांड आहे, आणि त्याचा नायनाट आम्हांला केलाच पाहिजे.

**कल्प०**—तर मग युद्धाचा मार्ग तुम्हाला खुला आहे. कैरव लढतील व

मरतील ! परंतु जिवंत असेपर्यंत आपल्या जन्मसिद्ध हक्कावर पाणी सोडण्यास तयार होणार नाहींत.

**उद्दाम०**—तर मग आचार्य, या क्षणापासून कैरवाविरुद्ध आम्ही युद्ध पुकारलें आहे.

**धर्मा०**—तूं कैरवाविरुद्ध युद्ध पुकारलेंस तर आम्हालाही तुझ्याविरुद्ध धर्मयुद्धाचें निशाण उभारणें भाग पडेल.

**उद्दाम०**—काय ? माझ्याविरुद्ध आपणाला धर्मयुद्धाचें निशाण उभारणें भाग पडेल ?

**धर्मा०**—होय. त्यावांचून आम्हांला गत्यंतर नाहीं.

**उद्दाम०**—पण धर्माचा या भानगडींत संबंध काय ?

**धर्मा०**—धर्मानें कैरवांच्या स्वयंनिर्णयाच्या हक्काला आपली संमति दिली आहे आणि त्या हक्कावर जर कोणी घाला घालूं पाहील, तर त्याचा प्रतिकार करणें, हें धर्मसिंहासनाचें कर्तव्यच आहे.

**उद्दाम०**—मला वाटतें, आचार्य या कृत्यानें धर्मसिंहासनाला प्राणसंकटांत घालीत आहेत.

**धर्मा०**—प्रबलांच्या जुलुमापासून दुर्बलांचें संरक्षण करीत असतां धर्मसिंहासनावर प्राणसंकट ओढवलें तर त्यांत धर्मसिंहासनाच्या जीविताचें सार्थकच आहे.

**उद्दाम०**—उद्दामपणाबद्दल दुर्बलांना प्रबलांकडून घडणाऱ्या न्याय्य शासनाला दुर्बलांवर होणारा प्रबलांचा जुलूम असें खोटेंच नांव देऊन धर्मसिंहासनानें आपल्या अन्याय्य आणि अधर्म्य वर्तनाचें समर्थन करणें आणि दुराचरणी दुर्बलांचा पक्ष घेऊन, मूढपणानें, आपलें जीवित हकनाक धोक्यांत घालणें ही शुद्ध आत्महत्त्या आहे. तेव्हां धर्मयुद्धास सज्ज होण्यापूर्वी आचार्यांनीं चांगला विचार करावा आणि कैरवांसारख्या क्षुद्र पामरांचा कैवार घेऊन आमच्यासारख्या समर्थांशीं सामन्याला उभें रहाण्याचा आग्रह न धरतां, धर्मसत्तेच्या अनिवार होऊं पहाणाऱ्या महत्त्वाकांक्षेला वेळींच लगाम घालावा. यांतच धर्मसिंहासनाचा मान आहे—यांतच धर्मसिंहासनाचा गौरव आहे.

**धर्मा०**—छे–हें कदापि शक्य नाहीं. धर्म हा समाजाचा पिता–समाजाचा

त्राता–समाजाचा शास्ता आहे. तो जर प्रबलांकडून दुर्बलांचा होत असलेला छळ निमूटपणें सहन करील अगर भयानें वा लोभानें प्रबलांचाच पुरस्कार करून समाजविध्वंसनाच्या पापकर्मांत त्यांना सहाय्य होईल, तर त्यानें ‘ धर्म ’ हें पवित्र नांव तरी धारण कां करावें ? अनाथ अनाश्रितांचा जुलमी प्रबलांपासून बचाव करण्याची ज्यांना हिंमत नसेल, तीं नामर्द धर्मसिंहासनें कावळ्याप्रमाणें शतावधि वर्षे पृथ्वीवर जिवंत नांदण्यांत अर्थ काय ? त्यापेक्षां अशा कर्मभ्रष्ट, धर्मनष्ट, नादान धर्मसिंहासनांचे तुकडे तुकडे होऊन तीं धुळीला मिळालीं तरी बेहत्तर!

**उद्दाम०**—आचार्य, नका–नका–धर्मसत्तेला आपल्या श्रेष्ठ पदावरून खालीं ओढून या हीन कर्माला प्रवृत्त करूं नका. धर्म हा शांततेचा पुरस्कर्ता आहे; युद्धाचा प्रवर्तक नाहीं.

**धर्मा०**—परंतु त्याबरोबरच तो जुल्माचा व बलात्काराचाही सहाय्यकर्ता नाहीं. त्याला शांतता प्रिय आहे, व तिची प्रस्थापना करण्यासाठींच त्याचा अवतार आहे. परंतु शांतता म्हणजे स्मशानशांतता, मात्र खास नाहीं. स्मशानशांतता ही जगाची मृतावस्था आहे–प्रलयावस्था आहे. तेंव्हां ती जगांत नांदण्यापेक्षां जग हें अष्टौप्रहर भीषण युद्धाच्या प्रचंड ज्वालांनीं धडाडत राहिलें, तरी त्याबद्दल धर्माला तिळमात्रही विषाद वाटावयाचा नाहीं.

**उद्दाम०**–आचार्य, धर्मयुद्ध झालें तरी तें युद्ध आहे; आणि युद्धांत यशाचा कांटा दुर्बलांच्या बाजूकडे कधींही झुकत नाहीं, हा दुनियेचा नित्याचा अनुभव आहे. तेंव्हां कैरवांच्या संरक्षणार्थ या धर्मसंग्रामांत धर्मसिंहासनानें आपलें शक्तिसर्वस्व खर्ची घातलें तरी या उद्दामकेतूच्या प्रचंड लष्करी सामर्थ्यापुढें त्याचा क्षणमात्रही टिकाव लागणार नाहीं, ही खात्री असूं द्या.

**धर्मा०**—परंतु लष्करी सामर्थ्य हेंच कांहीं जगांत एक अद्वितीय सामर्थ्य नाहीं. त्याहून अधिक प्रभावशाली अशीं दुसरींही अनेक सामर्थ्यें या ईश्वरी सृष्टींत नांदत आहेत; आणि त्यांच्याशीं तुलना करून पाहिली असतां तुझ्यासारख्या एखाद्या चक्रवर्ती सम्राटाचें प्रचंड भौतिक लष्करी सामर्थ्य त्यांच्या पासंगालाही पुरणार नाहीं.

**उद्दाम०**—या वल्गना फोल आहेत. जगांतील सर्व सामर्थ्यांना प्रसविणारी आदिशक्ति ही तलवार आहे आणि ती एकदां म्यानांतून बाहेर पडून भूतलावर

तांडव करूं लागली, म्हणजे जगांतलि इतर सर्व प्रभावशाली सामर्थ्यांना जागच्या-जागींच पटापट प्राण सोडावे लागतील.

**धर्मा०**—तलवारिची ही तुझी तरफदारी व्यर्थ आहे. या निर्जीव पोलादी पात्यानेंच जगाची उलथापालथ होणें शक्य असतें, तर षंढांनींही जगाचा रंग सहज पालटून टाकला असता. परंतु पुरुषार्थाचें मूळ पौरुषांत आहे–पोलादांत नाहीं; आणि पौरुषाचें अधिष्ठान आत्मसामर्थ्य आहे–देहसामर्थ्य नाहीं. तेव्हां उद्दामकेतु, आम्ही तुला पुनः एकवार बजावून सांगतों कीं तूं हा हट्ट सोड आणि कैरवावर स्वारी करून दक्षिणेंत युद्धाग्नीच्या ज्वाला न भडकावितां रक्तपाताच्या आणि मनुष्यसंहाराच्या भयंकर पापी साहसापासून समंजसपणानें परावृत्त हो. यांतच तुझें आणि तुझ्या राष्ट्राचें परमकल्याण आहे. नाहीं तर दुर्बलांच्या संरक्षणार्थ आम्हांला, उन्मत्तांचें दमन करणारा आपला धर्मदंड तुझ्यावर फेंकण्यावांचून गत्यंतर रहाणार नाहीं, लक्षांत ठेव.

**उद्दाम०**—आपल्या धर्मदंडाचा धाक बाळगिण्याइतका हा उद्दामकेतु बेहिमती किंवा कमकुवत नाहीं. असले एक सोडून छपन्न धर्मदंड जरी माझ्यावर भिरकाविण्यांत आले, तरी त्या सर्वांचें निमिषार्धांत चूर्ण करण्याचें अमोघ सामर्थ्य या उद्दामकेतूच्या बाहूंत वसत आहे. या उद्दामकेतूची वक्रदृष्टि झाला नाहीं, तोंपर्यंतच हीं धर्मसिंहासनें, हे धर्मदंड आणि हे धर्मगुरु मोठ्या डौलानें जगांत मिरवीत आहेत म्हणून समजा. परंतु याच्या निस्सीम धर्मनिष्ठेचा फायदा घेऊन जर तुम्ही त्याला नाहक चिडवाल, तर तुमच्या चिंधड्या उडविण्याला या उद्दामकेतूला एका क्षणाचाही विलंब लागणार नाहीं, हें खूप समजून असा.

**धर्मा०**—तर मग उन्मत्ता, हा पहा-हा पहा, मी आतांच तुझ्या उद्दाम मस्तकावर आपल्या धर्मदंडाचा पहिला प्रहार करतों. सांभाळ. हे आनंदखंडांतील धर्मनिष्ठ भूपालहो, धर्माज्ञा अमान्य करून या उद्दामकेतूनें आनंदखंडांतील या सर्वश्रेष्ठ धर्मसिंहासनाचा अपमान केला आहे; आणि परस्वापहाराच्या निंद्य कर्मापासून परावृत्त न होतां दीनदुर्बलांच्या नाशाचें अघोर कर्म अमानुषपणें सुरूं ठेवण्याचा निश्चय करून या सैतानानें धर्मद्रोह आरंभिला आहे. तेव्हां सर्वश्रेष्ठ धर्मसिंहासनाचे अधिपति या नात्यानें आम्ही आपणा सर्वांस असें जाहीर करतों कीं आजपासून आम्ही, उद्दामकेतु व अखिल

कांतारसाम्राज्यांविरुद्ध धर्मयुद्ध पुकारलें आहे. ( मलता- र )-आणि आमची आनंदखंडांतील सर्व धर्मनिष्ठ राजामहाराजांना [illegible] आज्ञा आहे कीं त्यांनी क्षणाचाही विलंब न लावतां आपल्या सर्व सेनासाहित्यासह समरांगणावर धर्मसेवेप्रत्यर्थ आमच्या धर्मयुद्धाच्या निशाणाखालीं येऊन दाखल व्हावें.

( धर्मनंदाचा जयजयकार.–पडदा पडतो. )

**अंक २ रा समाप्त.**

# अंक ३ रा.



## प्रवेश १ ला.

कांतारांची छातणी. उद्दामकेतूच्या तंबूसमोरील भाग.

**( तक्षक व चंद्रकला ).**

**चंद्र०**—तक्षक, हा एवढा गोंगाट कसला ?

**तक्षक**—लढाईच्या मैदानावरील जयघोषाचा असावा, असें वाटतें.

**चंद्र०**—जयघोष! कोणाचा जयघोष? कांतारांचा की कैरवांचा ?

**तक्षक**—अस्पष्टतेमुळें नीट कळत नाहीं. पण कांतारांचाच असला पाहिजे असा माझा सूर वहातो.

**चंद्र०**—तुमचा सूर नेहेमींच तसा वहात असतो. पण अनुभव मात्र कधींच तसा येत नाहीं.

**तक्षक**—पण आज माझा सूर-माझें भविष्य-खात्रीनें खरें होणार. कारण दाक्षिणात्य राजमंडळांतील प्रमुख भूपालांनीं जयाचा वाटा आज आमच्या पदरांत टाकण्याचें आम्हाला वचन दिलेलें आहे.

**चंद्र०**—मित्रांचीं मान कापणारे मांग शत्रूचीही मान कापणार नाहींत, असा भरंवसा धरूं नका. दगलबाजीला चटावलेला स्वभाव दग्याच्या वेळीं आपपर भाव ओळखीत नाहीं.

**तक्षक**—पण थांबा. तो भुजंग इकडे येत आहे. तो रणांगणावरील इत्थंभूत हकिकत आपल्याला सांगेल. ती आधीं ऐकूं या ( भुजंग येतो ). भुजंग, काय खबर ?

**भुजंग**—खबर काय विचारतां? फत्ते-फत्ते-टोलेजंग फत्ते! आनंद-आनंदी-आनंद-जिकडे तिकडे आनंदी आनंद ! कैरवांचा पार फडशा पडला-पुरी दाणादाण उडाली! इतकेंच नव्हे, तर सुरेंद्र आपला कैदी झाला !

**चंद्र०**—काय? सुरेंद्र कैदी झाला ?

**भुजंग**—होय. सुरेंद्राला कामलतेनें गिरफदार केलें-धर्मयुद्धाचें निशाण कामलतेच्या पायाखालीं तुडविलें गेलें-धर्मानंदाचें नाक कामलतेच्या तरवारीनें साफ कापलें गेलें !

**तक्षक**—भले शाबास ! भले बहाद्दर ! वारे कामलता–वारे कामलता !

**भुजंग**—तक्षक, कामलतेचा आजचा पराक्रम म्हणजे काय विचारतां ? अगदीं साक्षात्–मूर्तिमंत पराक्रमच तो ! नुसता कहर–नुसता गहजब–नुसता प्रलय! कालस्वरूपिणी आदिमायाच जगत्संहाराला सज्ज झाली आहे, असा भास होत होता ! अहाहा ! काय तें चापल्य–काय तें चांचल्य–काय तें कौशल्य ! सारेंच विलक्षण–सारेंच अद्‌भुत–सारेंच अलौकिक ! तल्वार नुसती बिजलीसारखी चमकत होती. क्षणांत या टोंकाला तर क्षणांत त्या टोंकाला ! नजर ठरणें मुष्कील झालें होतें ! मी तर तिचा हा पराक्रम पहात–दूर दगाडसारखा तटस्थ उभा होतों. महिषासुरमर्दनाच्या वेळीं साक्षात् महाकाली भवानीनें सुद्धां असा युद्धचमत्कार करून दाखविला नसेल ! ( पडद्यांत कामलतेचा जयजयकार ). पहा–पहा–तक्षक, माईसाहेब, पहा–सुरेंद्राला घेऊन विजयिनी कामल्ता इकडेच येत आहे. पहा, आणि मी वर्णन केलें, त्यांत एक अक्षर खोटें आहे कां सांगा. पहा–तल्वार रक्तानें भरलेली–हात रक्तानें माखलेलें–सर्वांग रक्तानें न्हाऊन निघालेलें ! रक्त–रक्त ! आजूबाजूला–मागेंपुढें–खालींवर–सर्वत्र दुष्मानांचें रक्त ! अहाहा ! साक्षात् संग्रामदेवता–प्रत्यक्ष संहारशक्ति ! हिची ही भीषण आणि भेसूर मूर्ति पाहून साक्षात् मृत्यूच्या सुद्धां छातींत भितीनें धडकी भरेल ! मग माणसें पटापट प्राण सोडतील यांत नवल काय ? जय कामलता–जय महिषासुरमर्दिनी–जय आदिशक्ति भवानी ! बोला, तक्षक, कामलतेचा जय बोला. माईसाहेब, कामल्तेचा जय बोला.

**चंद्र०**—तेवढा उद्योग तुम्हीच चालूं ठेवा. तुमचा जन्मच त्यासाठीं आहे. मला त्या चांडाळणीचें मुखावलोकन सुद्धां करण्याची इच्छा नाहीं.

( जाऊं लागते ).

**भुजंग**—हां–हां–हां -माईसाहेब–माईसाहेब, हा कामल्तेचा अपमान आहे–उपमर्द आहे ! यावेळीं आपण पुढें होऊन या संग्रामदेवतेचें–या विजयश्रीचें–प्रेमादरपूर्वक स्वागत केलें पाहिजे–तिचा सत्कार केला पाहिजे–तिचा जयजयकार केला पाहिजे !

**तक्षक**—भुजंगांचें म्हणणें यथार्थ आहे. आपण युवराज्ञी आहांत व सम्राटांच्या गैरहजिरींत हा आपलाच अधिकार आहे.

**चंद्र०**—तक्षक-भुजंग, हे सर्व अधिकार मी तुम्हालाच बहाल करतें. तुमच्यासारखे लाळघोटे लुब्रेच या अधिकाराला पात्र आहेत. तेव्हां जा. त्या तुमच्या संग्रामदेवतेला तुम्हींच सामोरे जा आणि त्या विजयश्रीच्या पायावर साष्टांग दंडवत घालून आपल्या नरजन्माचें सार्थक करून घ्या. मला तिचें स्वागत करावयाचें नाहीं—तिचा सत्कार करावयाचा नाहीं—आणि जयजयकार तर मुळींच करावयाचा नाहीं. ( जाते ).

**भुजंग**—तक्षक, पहा–पहा–पुनः राजद्रोह–पुनः साम्राज्यद्रोह ! सम्राटांच्या मेहेरबानीचा दुरुपयोग–सम्राटांच्या कृपेची पायमल्ली ! अक्षम्य–अगदीं अक्षम्य–बिलकुल अक्षम्य ! आपण या बाबत सम्राटांकडे तक्रार केली पाहिजे. दर वेळीं उर्मटपणा–दर वेळीं उद्धटपणा–म्हणजे याचा अर्थ काय ?

**तक्षक**—अहो, पण करावयाचें काय ? जित्याची खोड मेल्याशिवाय थोडच्चि जाणार ?

**भुजंग**—जित्याची खोड जिवंतपणी जर तुम्हाला घालवितां आली नाहीं, तर तुम्ही एवढे जहांबाज मुत्सद्दी कसले ? मी तर मेल्याचीं सुद्धां खोड जिवंतपणीं घालवून दाखवीन–सोडणार नाहीं.

**तक्षक**—ते सम्राट जाणोत आणि त्यांची ती मुलगी जाणो. एकदां अद्दल घडल्यावर आपल्याला पुनरपि या भानगडींत पडण्याचें कारण नाहीं. चला–ती कामलता आली. तिचें स्वागत आपण करूं या आधीं.

( जयजयकारांत कैदी सुरेंद्रासह कामलता प्र. क. ).

**तक्षक**
**भुजंग** } —विजयशालिनी राणी कामलतेचा जयजकार असो !

**काम०**—तक्षक-भुजंग, कोठें आहेत ? उद्दामकेतु महाराज कोठें आहेत ? बोलवा, त्यांना एकदम येथें बोलावून आणा. मी बेमान आहें–नामर्द आहे–नादान आहें, असें म्हणून सम्राटांनीं माझा अपमान केला आहे. तेव्हां कामलता बेमान नाहीं–नामर्द नाहीं–नादान नाहीं, मर्द आहे–नव्हे सवाई मर्द आहे आणि आपल्या इमानावर शाबूत आहे, याबद्दल सम्राटांना आपली खात्रीं करून घेऊं द्या.

**भुजंग**—हे दिग्विजयिनी संग्रामदेवते, थोडी शांत हो. राजमंडळांतील

राजांचा पराभव करून सम्राटांची स्वारी—ही पहा—इकडे तुझ्या स्वागतार्थ लगबगीनें येतेच आहे. तेव्हां तोंपर्यंत तूं आमच्याच स्वागताचा स्वीकार कर.

**काम०**—( स्व० ) सुरेंद्रांशीं बोलावेंसें वाटतें. पण त्यांच्याकडे डोळे वर करून पाण्याचीच छाती होत नाहीं. देवा, ज्या जिवाची ओढ मला रात्रंदिवस घायाळ करीत आहे, त्याची माझ्या हातून आज अशी विटंबना व्हावी काय ? खरोखर, शिरावर वीज कोंसळून या वेळीं मला मृत्यु येईल तर मी आपल्याला मोठी भाग्यवान समजेन. पण माझ्यासारख्या अधमाधम पापिणीला असा सुखासुखी मृत्यु कसा येणार ? अनंत हाल अपेष्टांनीं होरपळून—भाजून—तडफडतच मला मेलें पाहिजे ! धिःकार—कामलते, धिःकार असो तुला आणि तुझ्या असुरी राज्यलालसेला ! ( पडद्यांत उद्दामकेतूचा जयजयकार ). ( पाहून ) पण हा सैतान आलाच इकडे. याला पाहिलें कीं माझ्या पायांची आग एकदम मस्तकाला जाऊन पोहोंचते. चांडाळानें माझ्या सोन्यासारख्या जीविताची पार राखरांगोळी करून टाकली ! ( पुनः जयजयकार. उद्दाम० प्र. क. ).

**उद्दाम०**—कामलते, आजच्या तुझ्या लोकोत्तर विजयाबद्दल आम्ही तुझें अत्यंत प्रेमपुरस्सर अभिनंदन करितों.

**काम०**—मी आपली आभारी आहे. राजाधिराज, हा कांतारसम्राटांचा व साम्राज्याचा कट्टा दुस्मान मी आपल्या स्वाधीन करत्यें, त्याला राजाधिराजानीं आपल्या ताब्यांत घ्यावा.

**उद्दाम०**—ठीक आहे. सुरेंद्र, कैरवासारख्या दुर्बल पामरांच्या राज्यकारभारांत ढवळाढवळ करण्याचा कांतारसाम्राटासारख्या प्रबल समर्थांचा ईश्वरदत्त हक्क आतां निर्विवाद शाबीत झाला कीं नाहीं ?

**सुरेंद्र**—बिलकुल नाहीं. कालाची आयुर्मर्यादा अमर्याद आहे; आणि दुर्बलांचा पाठीराखा परमेश्वर अद्यापि मृत्यूच्या दाढेखालीं रगडला गेलेला नाहीं. तेव्हां कालस्वरूपी परमेश्वराच्या हयातीपर्यंत तरी दुर्बलांना भक्षण करण्याचा प्रबलांचा हक्क निर्विवादपणें शाबीत होणें बिलकुल शक्य नाहीं.

**उद्दाम०**—कैरव लोकसत्तेच्या प्रेतावर पाय देऊन कामलता जेव्हां कैरव राजसिंहासनावर आरूढ होईल, तेव्हां हा हक्क निर्विवादपणें शाबीत झाल्याबद्दल तुलाच काय, पण साऱ्या जगाला कबुली द्यावीच लागेल.

**सुरेंद्र**—पण कामलता आणि राजसिंहासन यांच्यामध्यें असलेलें शतावधि योजनांचें महदंतर आजच्या आकस्मिक विजयानें कापलें गेलें आहे, असें समजूं नका. कामलतेपासून राजसिंहासन अद्यापिही पूर्वीइतकेंच दूर आहे; व तें जवळ येईपर्यंत राजसत्तेचा पुरस्कार करणाऱ्या अनेक बलाढ्य राजामहाराजांचे मुगुट धुळीला मिळविले जातील हें पक्कें लक्षांत असूं द्या.

**उद्दाम०**—कमलतेच्या हातांत तळपणारी ही कांतारसम्राटाची प्रखर पराक्रमी तलवार, कोणी काय लक्षांत ठेवावें, हें सर्व जगाला आज कंठरवानें जाहीर करतेच आहे.

**सुरेंद्र**—पण जगानें या सैतानी तलवारीचा पराक्रम आजवर अनेकवार जोखून पाहिला असल्यामुळें तिच्या आक्रोशाकडे तें क्षणमात्रही लक्ष देणार नाहीं.

**उद्दाम०**—लक्ष देणार नाहीं तर त्याचें प्रायश्चित्त जगाला अनंतकाल भोगावें लागेल; सुटणार नाहीं. ही तलवार कालाची साक्षात् संहारशक्ति आहे; आणि हिच्या इषाऱ्याचा जगाकडून अनादर केला जाईल तर जगाला कालाच्या दाढेखालीं रगडलें जावें लागेल.

**सुरेंद्र**—जग कालाच्या दाढेखालीं रगडलें जातें का ही तलवार कालाच्या पायाखालीं तुडविली जाते, याचा निकाल लवकरच लागेल. निरपराधी दुर्बलांचें रक्त पितांना गोड लागलें तरी पचवितांना तें आंतडीं पिळून काढल्यावांचून सोडीत नाहीं.

**उद्दाम०**—ठीक आहे—पाहूं या. प्रबलदुर्बलांच्या या झगड्यांत दुर्बलांच्या रक्ताचें सामर्थ्य अधिक आहे, कां तें प्राशन करणाऱ्या या तलवारीचें सामर्थ्य अधिक आहे, तें प्रत्यक्ष अनुभवानें नक्की अजमावून पाहूंच या. कामलते, सुरेंद्र कैदी आमचा असला तरी गुन्हेगार तुझा आहे. तेव्हां तुझा विश्वासघात करून तुला देशोधडीला लावल्याबद्दल या हरामखोराला कोणतें शासन करावयाचें, याचा निर्णय आम्ही तुझ्याच मर्जीवर सोंपवितों. चांगला विचार कर आणि तुझा निश्चय काय होतो, तो तीन दिवसांच्या आंत आम्हाला कळीव. तोंपर्यंत सेनापति, याला तुमच्या लष्करी तुरुंगात चांगल्या बंदोबस्तानें नेऊन ठेवा.

( सेनापति सुरेंद्रास घेऊन जातो ).

**काम०**—महाराज, सुरेंद्राला पराभूत करून व आपल्या स्वाधीन करून मी

आपली प्रतिज्ञा पूर्ण केली आहे. तेव्हां ही तलवार महाराजांनीं आतां परत घ्यावी व मला युद्धाच्या जबाबदारींतून मुक्त करावें.

**उद्दाम०**—युद्धाच्या जबाबदारींतून मुक्त करावें ? छे ! सुरेंद्र आमच्या हस्तगत झाला असला तरी कल्पलता आणि धर्मानंद यांचा अद्यापि निकाल लागला नसल्यामुळें, ही तलवार परत घेऊन युद्धाच्या जबाबदारींतून तुला आम्हाला मोकळें करतां येत नाहीं.

**काम०**—नाहीं. आपण मला या जबाबदारींतून मोकळें केलेंच पाहिजे व आपल्याला तसें करावेंच लागेल. यापुढें रणक्षेत्रावर पाऊल टाकण्याची माझी बिलकुल इच्छा नाहीं.

**उद्दाम०**—कां ? रागाच्या भरांत आमच्या तोंडून चार दोन कठोर शब्द निघून गेले, म्हणून तुला इतका संताप आला आहे का ?

**काम०**—होय. म्हणूनच मला इतका संताप आला आहे. मला आश्रय देऊन माझें कार्य आपण शिरावर घेतलें असलें तरी तेवढ्यामुळें मी आपली बंदी गुलाम झालें नाहीं. मी स्वतंत्र आहे आणि राजकुलांत माझा जन्म झाला असल्यामुळें माझा दर्जाही श्रेष्ठ आहे. तेव्हां गुलामाच्या गुलामालाही सहन होणार नाहींत असे शब्द बेशरमपणानें मी बरदास्त कां करावेत ?

**उद्दाम०**—आमच्याकडून रागाच्या भरांत ती मोठी चूकच झाली. पण आतां तिच्याबद्दल आम्हाला फार वाईट वाटत आहे आणि तबिद्दल आम्ही तुझी क्षमा मागण्यालाही तयार आहोंत.

**काम०**—आपण क्षमा मागावयाला तयार असलां तरी मी क्षमा करावयास तयार नाहीं. आपले शब्द व त्यामधील गूढ भावार्थ विषारी बाणांप्रमाणें माझ्या हृदयाला जाऊन झोंबले आहेत. तेव्हां युद्धभूमीवर पाऊन न टाकण्याचा माझा निश्चय आतां कालत्रयीं ढळणार नाहीं.

**उद्दाम०**—ढळणार नाहीं ?

**काम०**—नाहीं. ढळणार नाहीं ?

**उद्दाम०**—छे ! तो ढळलाच पाहिजे. हें युद्ध आम्ही कांहीं आमच्याकरितां सुरू केलें नाहीं--तुझ्याकरितां सुरू केलें आहे. तेव्हां त्याची अखेर होईपर्यंत तें तुला केव्हांही असें मध्येंच सोडून देतां येणार नाहीं.

**काम०**—कां ? माझ्यासाठीं सुरू केलेलें युद्ध वाटेल तेव्हां सोडून देण्याचा

मला हक्क आहे; आणि तो बजावीत असतां माझ्या आड येण्याचा कोणालाही अधिकार नाहीं.

**उद्दाम०**—युद्ध तुझ्याकरितां सुरू करण्यांत आलें असलें तरी कांतारसम्राटानें त्याच्यापायीं अत्यंत घस्त सोसली आहे; आणि म्हणून तूं त्याच्यापासून परावृत्त होऊं लागलीस तर तुला मागें परतविण्याचा कांतारसम्राटाला पूर्ण अधिकार आहे.

**काम०**—पण मी त्याचा हा अधिकार माझ्यावर चालूं देणार नाहीं. या युद्धांत यापुढें भाग न घेण्याचा मी निश्चय केला आहे; व कोणाच्याही अधिकाराला–सत्तीला अगर जुलुमाला न जुमानतां तो अंमलांत आणल्यावांचून मी रहाणार नाहीं.

**उद्दाम०**—पण असा आत्मघातकी निश्चय करण्याला तुला कारण काय झालें हें आम्हाला कळल्यावांचून त्याची अंमलबजावणी करण्याचा तूं आग्रह धरून बसणें, हें आमच्या मतें अत्यंत गैरवाजवी व गैराशिस्त आहे.

**काम०**—महाराज, पाहुण्याच्या हातून साप मारविण्याचा आपण हा डाव खेळत आहांत, हें मला कळत नाहीं असें आपण समजतां काय ? माझ्या हातून कौरव मारले गेले तर त्यांत आपलाच फायदा आहे; आणि एखाद्या दिवशीं कौरवांच्या हातून माझा वध झाला तर तोही आपल्याला हवाच आहे. परंतु यापुढें मला या दोन्हीही गोष्टी नको आहेत. माझा हात यापुढें कौरवांवर उचलला जाणार नाहीं अगर त्यांच्याही हाताचा स्पर्श कांहीं काल तरी माझ्या शरिराला होणार नाहीं. वास्तविक आपल्या शब्दांनीं आपल्या अंतःकरणांतील गूढ भाव स्पष्ट प्रगट झाल्यावर मी आजसुद्धां रणांगणावर पाऊल टाकावयास नको होतें परंतु प्रेमासारख्या दुर्जिक्य शक्तीलाही कामलतेच्या तत्त्वनिष्ठेचा भंग करणें शक्य नाहीं ही गोष्ट आपल्या प्रत्ययाला आणून देण्याचा आत्मघातकी मोह मला आवरतां आला नाहीं. आणि मी मूढेनें आज या अघोर राक्षसी कृत्यानें रणभूमीचें पावित्र्य धुळीला मिळाविलें. परंतु मला आतां या अमंगल पापकर्माचा अगदीं वीट आला आहे; आणि स्वजनांच्या रक्तानें रंगून निघालेल्या राजसिंहासनाचा उपभोग घेण्यापेक्षां भिक्षापात्र घेऊन भीक मागत हिंडणें चांगलें, असा माझ्या बुद्धीचा ठाम निश्चय झाला आहे.

**उद्दाम०**—अस्सें! एकूण आपल्याच हातून आपल्या आप्तइष्टांचा होत असलेला

संहार पाहून अर्जुनाप्रमाणें तुझ्याही चित्ताला आज कार्पण्यदोषानें ग्रासून टाकलें आहे! आणि त्यामुळें तत्वनिष्ठेला फांटा देऊन या कांतारसम्राटाच्या तलवारीचा तूं धिःकारपूर्वक असा त्याग करीत आहेस! ठीक आहे. आण ती तलवार इकडे. (तलवार घेऊन) जा. या क्षणापासून आम्ही तुला युद्धाच्या जबाबदारींतून मोकळें केलें आहे; आणि शक्य तोंपर्यंत पुनः ही जबाबदारी आमच्याकडून तुझ्या शिरा-वर केव्हांही लादली जाणार नाहीं. तुझ्या मदतीवांचूनही कांतारसम्राटाची ही तलवार रणांगणावर विजयी होऊं शकते, हें तुझ्या लौकरच प्रत्ययाला येईल. जा. तुझें भडकलेलें डोकें पश्चात्तापानें ताळ्यावर येईपर्यंत आतां यापुढें आपलें तोंड आम्हाला दाखवूं नकोस. या क्षणापासून आम्ही तुझ्याशीं असहकार केला आहे. जा. तुझ्या दगलबाजाच्या वर्तनामुळें आमचें डोकें अगदीं फिरूं लागलें आहे. जा.

**काम०**—माझ्या दगलबाजीमुळें आपलें डोकें फिरूं लागलें आहे. पण आपल्या दगलबाजीनें फिरून जाण्यासाठीं मला मुळीं आतां डोकेंच शिल्लक राहिलें नाहीं. येतें मी. ( जाऊं लागते ).

**उद्दाम०**—पण थांब. चंद्रकलेला आम्ही तुझ्या मदतीसाठीं पाठविली होती ती कोठें आहे?

**काम०**—चंद्रकला माझ्या मदतीला आली नव्हती आणि ती कोठें आहे हें मला माहीत नाहीं. ( निघून जाते ).

**उद्दाम०**—म्हणजे? तक्षक, आम्ही चंद्रकलेला रणांगणावरून पाठविलेला संदेश तिला मिळाला नाहीं का?

**तक्षक**—आपला संदेश त्यांना ताबडतोब मिळाला. परंतु राणीच्या मदतीला जाण्याचा त्यांनीं साफ इनकार केला.

**उद्दाम०**—इन्कार केला? कां?

**भुजंग**—महाराजांचा पक्ष असत्याचा, अन्यायाचा व अधर्माचा आहे व माईसाहेबांना असत्याची, अन्यायाची व अधर्माची भयंकर चीड आहे. तेव्हां त्या राणीसाहेबांच्या मदतीला जाण्याचा इन्कार करणार नाहींत, तर काय करतील?

**उद्दाम०**—म्हणजे? अजून असत्य, अन्याय आणि अधर्म यांच्या खुळचट कल्पनांनीं तिचें डोकें पिसाटलेलेंच आहे का?

**तक्षक**—सरकार, माथेफिरू धर्मवेड्यांचीं वेडें क्षमेच्या सौम्य उपचारांनीं कधीं नाहींशीं झालीं आहेत काय ?

**भुजंग**—शक्य नाहीं. त्यांच्यावर सोटेशाहीचे जालीम उपायच योजले पाहिजेत. चांभारांचे देव खेटरांच्या पूजेवांचून प्रसन्न होत नाहींत.

**उद्दाम०**—तर मग तिला क्षमा करण्यांत आमची मोठी चूकच झाली म्हणावयाची !

**भुजंग**—चूक म्हणजे ? भयंकर चूक झाली. नाहीं तर सुरेंद्राबरोबर कल्पलता व धर्मानंद हेही आज राणसाहेबांनीं गिरफ्दार करून आपल्यापुढें खात्रीनें हजर केले असते व युद्धाची समाप्ति होऊन सर्वत्र आनंदी आनंद झाला असता. परंतु माईसाहेबांनीं ऐन वेळीं असा दगा दिल्यामुळें हा सारा घोंटाळा झाला. राणीला राग आला तो खरोखर आपल्या शब्दांचा आला नसून युवराज्ञीच्या या उद्धट वर्तनाचा आला आहे. आणि याबद्दल आपण तिची चांगली हजेरी घेतली पाहिजे.

**उद्दाम०**—तक्षक, चंद्रकलेला आतांच्या आतां आमच्यासमोर हजर करा.

**तक्षक०**—जशी सरकारची आज्ञा. ( जातो ).

**उद्दाम०**—भुजंग, आज कामलता फारच बिथरलेली दिसते !

**भुजंग**—सुरेंद्र पकडला गेल्यामुळें त्यांना हा प्रेमवायूचा झटका आला असून त्यांत युवराज्ञीच्या उद्दाम वर्तनाची भर पडली आहे. पण हें त्यांचें सोंग फार वेळ टिकणार नाहीं. सरकारांनीं निश्चिंत असावें. त्यांच्या डोक्यावर लागू पडणाऱ्या साऱ्या रामबाण मात्रा या दासाच्या बटव्यांत भरलेल्या आहेत. रात्र उलटून दिवस उजाडूं द्या. म्हणजे हें बिथरलेलें पिशाच्च बाटलींत भरून मी सरकारांच्या चरणाशीं हजर केलें नाहीं तर नांव बदलून देईन.

**उद्दाम०**—एका अर्थीं फार उत्तम झालें. कैरव राजसिंहासनावरचा हिचा हक्क अजिबात उडवून देण्याला हें फारच योग्य कारण सांपडलें. पण यापुढें हिला अगदीं मोकळी ठेवून उपयोगीं नाहीं. तुमच्या मंत्रानें ही ताळ्यावर येत नाहीं असें दिसतांच हिला नागव्या तलवारीच्या सक्त पहाऱ्यांत बसविली पाहिजे. नाहीं तर एखादे दिवशीं ही चट्कन उठून कैरवांच्या छावणींत निघून जाईल; आणि मग लढाईचें मूळ कारण नाहींसें होऊन आमच्या तरवारीचा आणि प्रेमाचा धिःकार केल्याबद्दल हिच्यावर सूड उगविण्याची संधि आम्हाला कधींच मिळणार नाहीं.

**भुजंग**—सरकारांचें म्हणणें अगदीं यथार्थ आहे. (तक्षक व चंद्रकला प्र. क.).

**चंद्र०**—बाबा, काय आज्ञा आहे ?

**उद्दाम०**—चंद्रकले, कामलतेच्या मदतीसाठीं एकदम रणांगणावर दाखल होण्याविषयीं आम्ही तुला संदेश पाठविला होता ना ?

**चंद्र०**—होय; आणि तो मला तावडतोब मिळालाही होता.

**उद्दाम०**—मग त्याप्रमाणें तूं रणांगणावर दाखल झाली होतीस ?

**चंद्र०**—नाहीं.

**उद्दाम०**—कां नाहीं ?

**चंद्र०**—बाबा, परस्वापहारार्थ आरंभिण्यांत आलेल्या या राक्षसी युद्धांत उन्मत्त प्रबलांच्या वतीनें निरपराधी दुर्बलांच्या विरुद्ध शस्त्र धारण करावयाचें नाहीं, अशी मी प्रतिज्ञा केली आहे.

**उद्दाम०**—प्रतिज्ञा केली आहेस ?

**चंद्र०**—होय. प्रतिज्ञा केली आहे.

**तक्षक०**—पण हें युद्ध परस्वापहारार्थ आरंभिण्यांत आलेलें आहे, असें म्हणण्यास आपल्याला आधार काय ?

**चंद्र०**—तक्षक, उद्दामकेतु महाराजांची मी साक्षात् कन्या आहें व त्यांच्या आंतड्याचा रंग गोरा आहे कीं काळा आहे, याची ओळख तुमच्यापेक्षां मला अधिक आहे.

**उद्दाम०**—चंद्रकले, आमचें आंतडें गोरें असो वा काळें असो. पण त्याची तुझ्या या साडेतीन हात लांबीच्या मांसपिंडाशीं तुझ्या मातेच्या गर्भांतच गांठ पडलेली आहे, हें तुला माहीत आहे कीं नाहीं ?

**चंद्र०**—आहे. हें मलाच नव्हे तर सर्व जगालाच माहीत आहे. पण आपल्या आंतड्यांपासून हा मांसपिंड जन्माला आला असला तरी त्यांत वास्तव्य करणारा जीवात्मा कांहीं त्यानें जन्माला घातलेला नाहीं. तो स्वयंभू आहे.–स्वयंसिद्ध आहे; आणि त्याच्यावर एका सत्यस्वरूपी परमेश्वरावांचून कोणाची काडीमात्रही सत्ता नांदत नाहीं.

**उद्दाम०**—जीवात्म्यावर त्याची सत्ता असेल. पण या तुझ्या देहात्म्यावर कांहीं त्याची सत्ता खास नाहीं. तो या कांतारसम्राटाच्याच मालकीचा आहे; व त्यानें त्याच्या विजयासाठीं या युद्धांत आपलें बलिदान करण्यास तयार झालेंच पाहिजे.

**चंद्र०**—पण मला कांतारसम्राटाच्या विजयाचीच मुळीं पर्वा नाहीं.

**उद्दाम०**—काय? आमच्या विजयाची तुला पर्वा नाहीं?

**चंद्र०**—नाहीं-बिलकुल नाहीं. उलट आपण चालविलेल्या या भयंकर पाप-कर्मात परमेश्वरानें आपल्या सैतानी तरवारीला केव्हांही यश देऊं नये, अशीच मी रात्रंदिवस परमेश्वरापाशीं प्रार्थना करीत आहें व पुढेंही युद्धसमाप्तीपर्यंत करीत राहीन- आणि मला पक्की खात्री आहे कीं परमेश्वर माझी प्रार्थना शेंवटीं मंजूर केल्यावांचून रहाणार नाहीं.

**उद्दाम०**—असेंच असेल तर हें युद्ध विजयी करून दाखविण्याची जबाबदारी तुलाच आपल्या शिरावर घ्यावी लागेल.

**चंद्र०**—नाहीं. ही जबाबदारी मी केव्हांही आपल्या शिरावर घेणार नाहीं.

**उद्दाम०**—घेणार नाहींस? चंद्रकले, अविश्रांत श्रम घेऊन युद्धकलेंत आम्ही तुला निष्णात केली ती तुला देवघरांत देव्हाऱ्यांत पुजून ठेवण्यासाठीं केली नाहीं. उद्यां तुला रणांगणावर गेलेंच पाहिजे आणि तुला दिलेल्या शिक्षणाचा फायदा आमच्या पदरांत टाकलाच पाहिजे.

**चंद्र०**—रणांगण व खाटिकखाना यांत जोंवर तफावत केली जाणार नाहीं, तोंवर माझ्या विद्येचा आपणास यत्किंचितही फायदा मिळावयाचा नाहीं. तलवार धरण्याची मला हौस आहे व चालविण्याची हिंमतही पण आहे. पण तलवार म्हणजे खाटकाचा सुरा अगर मारेकऱ्याची कट्यार म्हणून माझ्यापुढें करण्यांत येईल तर मी तिला धुडकावून लावल्याशिवाय राहणार नाहीं.

**भुजंग**—पण ही कांतारसम्राटाची तलवार म्हणजे खाटकाचा सुरा अगर मारेकऱ्याची कट्यार खात्रीनें नाहीं.

**तक्षक**—ती एक पवित्र देवता-दिव्य शक्ति आहे; आणि तिचें पूजन हें साक्षात् परमेश्वराचें पूजन आहे.

**चंद्र०**—छे, दीनदुर्बलांच्या रक्ताकरितां हापापलेल्या तरवारीच्या ठिकाणीं परमेश्वराचें दिव्य चैतन्य नांदूंच शकत नाहीं. तेथें सदैव सैतानाचाच वास असतो; आणि तिच्या पूजनानें सैतानाच्याच सेवेचें पाप पदरीं पडतें-ईश्वराच्या आराधनेचें पुण्य लाभत नाहीं.

**भुजंग**—हां-हां-माईसाहेब, कांतारसम्राटांच्या तलवारीला सैतानी म्हणून आपण तिचा अपमान करीत आहांत!

**चंद्र०**—आणि तो केव्हांही करणारच. सैतानी शक्तीच्या स्तुतिपाठासाठीं कांहीं देवानें या चंद्रकलेची वाणी पैदा केलेली नाहीं.

**उद्दाम०**—तर मग तुला आमच्या या तलवारीचा स्तुतिपाठच नव्हे तर स्वीकारही करावा लागेल. चल–घे–ही तलवार घे आणि उद्यां रणांगणावर दाखल होण्याची आमच्या पायांशीं शपथ कर.

**चंद्र०**—नाहीं. बाबा, मी या तलवारीला स्पर्श करणार नाहीं.—

पद—या शृंगारा लहरी०

**हा तारा या अबला ॥ कर जो प्रभुनें दिला भला । अधःपात जरि कलंकिला ॥ धृ० ॥ रुधिरपानातुरा । सतत जी खला खड्गधारा ॥ असुरशक्ति; धिःकार तिला ! ॥ १ ॥**

**उद्दाम०**—नाहीं. या आमच्या तलवारीचा धिःकार आम्ही क्षणभरही सहन करणार नाहीं. तुला हिचा स्वीकार केलाच पाहिजे व तो तुला करावाच लागेल.

**चंद्र०**—नाहीं. हिच्यावर सांडलेलें हें निरपराध दुर्बलांचें दुःखी रक्त माझ्या हृदयाचें पाणी पाणी करून टाकीत आहे आणि या पापी तलवारीस स्पर्श करूं नकोस–हिच्यापासून दूर रहा–असा माझ्या कानाशीं सारखा टाहो फोडीत आहे.

**उद्दाम०**—पण चंद्रकले, या कंगाल रक्ताचा हा टाहो ऐकून तूं या तलवारीपासून दूर राहिलीस तर कांतार साम्राज्यसिंहासनाला तुझा स्पर्शही होणार नाहीं, हें लक्षांत ठेव.

**चंद्र०**—पर्वा नाहीं. दीनदुर्बलांच्या रक्तानें माजास आलेल्या या कांतारसाम्राज्यसिंहासनाच्या विषारी सांवलींत हा पिंड धुष्टपुष्ट करण्यापेक्षां कंगाल भिकारीण होऊन उकिरड्यावर कुत्र्याच्या मोतीनें तडफडून मरणेंही मी मोठ्या आनंदानें पत्करीन.

**उद्दाम०**—तर मग तक्षक, या क्षणापासून हिचे युवराज्ञीपदाचे सर्व अधिकार आम्ही काढून घेतले आहेत व हिला भिक्षांदेहीची शिक्षा फर्माविली आहे. तेव्हां हिचे हे सर्व राजवस्त्रालंकार काढून घेऊन आतांच्या आतां हिला राजवाड्याबाहेर घालवून द्या.–चला–घेऊन चला हिला येथून.

**चंद्र०**—चला मला–घेऊन चला. दुर्बलहत्त्येच्या पापाच्या दुर्गंधांत आजन्म कुजत पडण्यापेक्षां दारिद्र्याच्या हालअपेष्टा मला शतपटीनें आनंददायक होतील. महाराज, येतें मी. पण आपण मात्र हें लक्षांत ठेवा कीं—

पद्—बेहाग–त्रिताल, हां मोरि चुरिया०–

**जे नर अत्याचारि । प्राण–धन–हारी ॥ कुविचारी ॥ नित छळिति जनपदा ॥ प्रबल तरिहि । खचित तरति न कधिं या संसारीं ॥ धृ० ॥ पीडित जनता । शापुनि जाळी ॥ खल चांडाल । महाबल–धारी ॥ १ ॥**

( जाते. पडदा पडतो ).

---

## प्रवेश २ रा.



( स्थळ–रणांगणाचा एक भाग. कल्पलता विचार करीत हिंडत आहे ).

**कल्प०**—( स्व० ) कोण भयंकर कहर हा! सारी रणभूमि कैरवांच्या रक्तानें भरून निघाली आहे! झाला–धर्मपक्षाचा आतां पुरा घात झाला! परमेश्वरा, ज्या स्वदेशभक्त स्वातंत्र्यवीरांच्या रक्तानें स्वातंत्र्याचा दिव्य कल्पवृक्ष पालविला जावा, त्यानें आतां पारतंत्र्याच्या विषवल्लीची जोपासना होण्याची पाळी यावी काय? झालें! आतां यापुढें—

पद्—बागेसरी–त्रिताल. तनन देरेना०

**अभय प्रबला खला नरासुरासि या ॥ अगतिका अबला जना छळावया ॥ धृ० ॥ समर–विजय–मद–भरें भरुनिया ॥ घाता सजतां । अनाथ पतिता । हताश जगता ॥ नच कुणि आतां । समर्थ त्राता ॥ भयांध जगिं या । भयाण समयां ॥ महा–प्रलय–छाया ॥ १ ॥** ( स्तब्ध रहातें. दुसऱ्याबाजूने कमलता प्र० क० )

**काम०**—( स्व० ) स्वदेशद्रोहाचें प्रायश्चित्त भोगण्यासाठीं मी आपली छावणी सोडून कैरवांच्या छावणीकडे चाललें आहे खरी; पण असें केल्यानें मला कृतापराधाचें शासन घडविण्यापलिकडे कैरवांना अधिक कांहीं लाभ होईल काय? छे! नाहीं. मला मारल्यानें एका विवेकभ्रष्ट स्वदेशघातकी स्त्रीला शिक्षा केल्याचें समाधान फार तर त्यांना लाभेल! पण तेवढ्यानें सुरेंद्रांचा मृत्यु टळावयाचा नाहीं आणि उद्दामकेतूचा कांटाही त्यांच्या वाटेंतून दूर व्हावयाचा नाहीं. तेव्हां नको. हें नाहींच कामाचें. आत्महत्त्या जशी उपयोगी

नाहीं, तस कैरवांच्या हातून घ्यावयाचें देहान्तप्रायाश्चित्तही या वळीं अकालींच होईल. सुरेंद्र पहिल्यानें मुक्त झाले पाहिजेत आणि उद्दामकेतु या हातांनीं मारला गेला पाहिजे. त्यावांचून हें प्रायाश्चित्त मला घेतांच येत नाहीं. तेव्हां सुरेंद्रांना मुक्त करून उद्दामकेतूच्या रक्तानें या हातावरील हे स्वजनांच्या रक्ताचे डाग पहिल्यानें मला धुवून काढले पाहिजेत ! मला आतां ते अगदीं असह्य झाले आहेत.

**पद्-मांड**-झपताल. विषमता मज गमे०—

**शांतता नच कदा । ठावि हृद्यांतरा ॥**
**रक्त-लांछन सदा । जाळितें या करा ॥ धृ० ॥**
**चित्तासि दे ताप ॥ स्वजन-वध खर पाप ॥**
**करि प्रखर जन-शाप ॥ जीव अति घाबरा ॥१॥**

( अश्रु गाळीत उभी रहाते ).

**कल्प०**—( पाहून ) कोण आहे तें ?

**काम०**—तूं कोण आहेस ?

**कल्प०**—कैरवांची मित्र आणि कांतारांची शत्रु—

**काम०**—कैरवांची मित्र आणि कांतारांची शत्रु ! तर मग तूं कल्पलता आहेस !

**कल्प०**—होय. मी कैरवांची राणी कल्पलताच आहे. पण तूं-तूं कोण आहेस ?

**काम०**—मी कोण आहें हें मलाच कळत नाहीं. कैरवांची शत्रु म्हणेन तर आतां माझ्या अंतःकरणांत त्यांच्या शत्रुत्वाचा लवलेशही नाहीं. परंतु मित्र म्हणेन तर या माझ्या हातांवरील हे स्वजनांच्या रक्ताचे डाग तो शब्द मला वाणीवाटे उच्चारूं देत नाहींत ! तेव्हां मी कोण आहें, हें तुला काय सांगूं ?

**कल्प०**—पण तूं सांगितलें नाहींस तरी कामलते, मी तुला ओळखलें. चांडाळणी, बरी सांपडलीस. आतां तुझ्या कृतकर्मांचें फल तुला भोगाविल्यावांचून मी सोडीत नाहीं. ( तरवार उपसून तिच्या अंगावर धांवते ).

**काम०**—(तिचा हात अडवून). थांब-कल्पलते, थोडी थांब. माझ्या कृतकर्मांचें फल मी भोगणारच आहें आणि तेंही तुझ्याच हातून भोगणार आहे. पण त्याला अजून थोडा अवकाश आहे. तेव्हां तोंपर्यंत आपली तलवार म्यानांत घालून ठेव.

**कल्प०**—नाहीं-स्वजनांच्या रक्तानें हात माखणाऱ्या राक्षसिणी, तुझ्या नरडीचा घोंट घेतल्यावांचून माझी तलवार आतां म्यानांत जाणार नाहीं.

**काम०**—कल्पलते, माझें रक्त पिण्याला जितकी तुझी तलवार आतुर झाली आहे, त्यापेक्षां आपलें रक्त तुझ्या तलवारीवर सांडण्याला मी अधिक आतुर झाल्यें आहें. परंतु काय करूं? धारातीर्थी पतन पावलेल्या माझ्या स्वदेशबांधवांचें शत्रूच्या रक्तानें तर्पण केल्यावांचून तुझ्या तलवारीखालीं आपली मान देण्याला माझें मन मला सांगत नाहीं. तेव्हां कृपा कर, आणि थोडा वेळ आपला क्रोध आवरून धर. स्वजनांच्या रक्तानें मळलेले माझे हे हात उद्दामकेतूच्या रक्तांत बुचकळून काढून स्वच्छ केल्यावर कृतापराधांचें प्रायश्चित्त भोगण्यासाठीं मी आपण होऊन तुझ्या स्वाधीन होईन आणि तुझ्या तलवारीखालीं तुटून पडण्यासाठीं ही मान मोठ्या आनंदानें तुझ्यापुढें करीन.

**कल्प०**—कामलते, तुझ्यासारख्या मायावी राक्षशिणीच्या थापांना भुलून मी तुला आयती सांपडली असतां सोडून देईन, असें समजूं नकोस.

**काम०**—या तुझ्या वल्गनेंत कांहीं अर्थ नाहीं. या वेळीं मी जशी तुझ्या हातांत आयती सांपडलें आहे, तशीच तूंही माझ्या हातांत आयती सांपडली आहेस; आणि तुला माझ्यावर सूड घेण्याला जशी सहज संधि मिळाली आहे तशी तुझ्यावर सूड उगविण्याला मलाही तितकीच सहज संधि मिळाली आहे. परंतु या संधीचा फायदा घेण्याची माझी बिलकुल इच्छा नाहीं; आणि तूंही तो घेण्याच्या भानगडींत पडूं नयेस असें माझें तुला आग्रहाचें सांगणें आहे.

**कल्प०**—नाहीं-या वेळीं आपण दोघी एकट्या आहोंत व दोघींनाही सारखाच धोका आहे. तेव्हां एकमेकींच्या तलवारीवर तलवार घांसून आपल्यामधील भांडणाचा आपण कायमचा निकाल तरी लावून टाकूं. म्हणजे हें युद्ध बंद पडून हा प्रत्यहीं होत असलेला अमानुष मनुष्यसंहार तरी तत्काल थांबेल.

**काम०**—शक्य नाहीं. तुझ्या हातून मी मेल्यें काय व माझ्या हातून तूं मेलीस काय, अगर परस्परांच्या हातून आपण दोघीही मेलों काय, आपल्या मरणानें हा अनर्थ बंद पडावयाचा नाहीं. या भयंकर अनर्थाला उद्दामकेतु आणि एक उद्दामकेतूच सर्वस्वी कारण आहे. तेव्हां हा अनर्थ बंद पडण्याला त्याचा कायमचा बंदोबस्त करणें एवढा एकच रामबाण उपाय आहे आणि शक्य तितक्या लौकर तो अंमलांत आणण्याचा माझा निश्चय झालेला आहे. तेव्हां ती तलवार

मुकाट्यानें म्यानांत घाल आणि आल्या वाटेनें परत आपल्या छावणींत जा व मलाही माझ्या छावणींत परत जाऊं दे.

**कल्प०**—नाहीं. तुझा प्राण घेतल्यावांचून अगर आपला दिल्यावांचून मी येथून हालणार नाहीं व तुलाही हालूं देणार नाहीं.

**काम०**—नको–कल्पलते, असा हट्ट करूं नकोस. आजारीपणामुळें तूं इतकी अशक्त झालीस आहे कीं तुझ्यानें माझ्यापुढें एक क्षणभरही टिकाव धरवणार नाहीं.

**कल्प०**—टिकाव धरवला नाहीं तरी बेहेतर. पण तुझ्यासारख्या दुष्माननीला, हातांत सांपडली असतां, सोडून दिल्याचें पाप मी आपल्या माथीं मारून घेणार नाहीं.

**काम०**—पण कल्पलते, या हातावर पडलेले हे स्वजनांच्या रक्ताचे डाग आधींच माझा जीव पश्चात्तापानें होरपळून काढीत आहेत. त्यांत तुझ्या रक्ताच्या डागाची भर टाकण्याची माझी इच्छा नाहीं.

**कल्प०**—आतां तुझ्या इच्छे अनिच्छेचा सवालच नाहीं. तुझी इच्छा असो वा नसो, तुला माझ्याशीं लढलेंच पाहिजे व आपल्या भांडणाचा निकाल लावून घेतलाच पाहिजे. यापुढें कल्पलता तरी एक जगांत जिवंत नांदेल, नाहींतर कामलता तरी नांदेल. दोघी नांदूं शकणार नाहींत.

**काम०**—कां नांदूं शकणार नाहींत ? मी तुला नांदूं देण्याला तयार आहें आणि तूं मला निदान कांहीं काळ तरी नांदूं दिलेंस तर त्यांत तुझी कोणत्याही प्रकारची हानि नाहीं.

**कल्प०**—पण माझ्यापुढें या वेळीं लाभहानीचा सवालच नाहीं. माझ्या देशाच्या कंठाला कडकडून चावा घेणारी महाविषारी नागीण या वेळीं माझ्या तावडींत सांपडली आहे. आणि तिचें डोकें ठेंचून टाकणें, एवढा एकच विचार यावेळीं माझ्या डोळ्यांना दिसत आहे. तेव्हां चल–तलवार काढ आणि मुकाट्यानें माझ्याबरोबर लढण्यास तयार हो.

**काम०**—ठीक आहे. तुझा हट्टच आहे तर मला तुझ्याशीं लढणेंच भाग आहे. चल–उचल आपली तलवार आणि घाल माझ्यावर घाव.

**कल्प०**—माझी तलवार उचललेलीच आहे. तूं आपली तलवार काढ म्हणजे झालें !

**काम०**—छे ! तुझ्यावर चालविण्यासाठीं माझी तलवार म्यानांतून बाहेर पडणार नाहीं. मी तलवारीवांचूनच तुझ्याशीं लढण्यास तयार आहे.

**कल्प०**—तलवारीवांचूनच लढण्याला तयार आहेस ?

**काम०**—होय. तूं सशस्त्र आणि मी निःशस्त्र असेंच आपलें द्वंद्वयुद्ध झालें पाहिजे. तुझ्या हातांत तलवार असली तरी माझ्याशीं झुंजण्याइतकें तुझ्या अंगांत आज बळ राहिलेलें नाहीं, हें मला माहीत आहे. तेव्हां मी तुझ्याशीं तलवारीनें लढल्यास तें अधर्मयुद्ध होईल–धर्मयुद्ध होणार नाहीं.

**कल्प०**—ठीक आहे. तुला आपल्या बळाची एवढी घमेंडच आहे तर होऊं दे तुझ्याच इच्छेप्रमाणें. चल, सावध हो–सांभाळ–माझ्या तलवारीचा घाव आला–( तिच्यावर वार करण्यास जाते. कामलता तिची तलवार काढून घेऊन तिला आपल्या पायांशीं दाबून धरते ).

**काम०**—कल्पलते, बोल. आतां आपण दोघीही जगांत जिवंत नांदूं शकूं कां नाहीं, तें बोल.

**कल्प०**—( विरमून ) नाहीं. तुझा जिवंत रहाण्याचा हक्क तूं निर्विवाद शाबीत केला आहेस; परंतु माझा हक्क मात्र आतां शिल्लक राहिलेला नाहीं.

**काम०**—कोण म्हणतें शिल्लक राहिलेला नाहीं ? ही कामलता जिवंत असे-पर्यंत यापुढें कल्पलतेच्या केंसालाही धक्का लावण्याला जगांत कोणी समर्थ नाहीं. चल, ऊठ. ही आपली तलवार घे आणि ताबडतोब आपल्या छावणींत परत जा.

**कल्प०**—मला तुझ्यापासून प्राणदान नको आहे.

**काम०**—पण मी तुला तुझ्या प्राणाचें दान करीतच नाहीं. हें माझ्या मातृभूमीचें प्राणदान आहे. माझ्या राष्ट्रदेवतेचें प्राणदान आहे, आणि त्याचा स्वीकार तुला केलाच पाहिजे.

**कल्प०**—नाहीं. मी त्याचा स्वीकार करणार नाहीं.

**काम०**—( रागानें ) तर मरा जा. ही तलवार घे आणि माझ्या दृष्टिआड होऊन जगाच्या कोणत्याही कोनाकोंपऱ्यांत आपल्या हातानें आपली मान कापून घे. तूं कल्पलता नाहींस. तूं कैरव राष्ट्राचा प्राण आहेस–नव्हे–साक्षात् आत्मा आहेस ! तेव्हां तूं जरी युगान्तापर्यंत मरणासाठीं माझ्या पायांशीं धरणें धरून बसलीस तरी माझा हात तुझ्यावर केव्हांही उचलला जाणार नाहीं.

**कल्प०**—( आश्चर्यानें ) ही कामलताच माझ्याशीं बोलत आहे कां ?

**काम०**—होय. ही कामलताच तुझ्याशीं बोलत आहे. पण जिनें स्वदेश-हत्येच्या पातकानें आपला अधःपात करून घेतला, ती मात्र ही कामलता नाहीं. ती कामलता पश्चात्तापाच्या अग्नींत जळून खाक झाली !

**कल्प०**—तर मग ताई, ये—मला तुला कडकडून मिठी मारूं दे. ( तिला भेटण्यास सरसावते ).

**काम०**—( अडवून ) नाहीं—कल्पलते, नाहीं—उद्दामकेतूच्या रक्तानें हे हात धुवून काढल्यावांचून व सुरेंद्राला तुझ्या पुनः स्वाधीन केल्यावांचून या पातकी हातांनीं मी तुला स्पर्श करणार नाहीं.

**कल्प०**—तर मग आतांच्या आतां माझ्याबरोबर आमच्या छावणींत चल. मी तुला धर्मसेनेचें अधिपत्य अर्पण करतें. म्हणजे उद्यां रणांगणावर उद्दामकेतूचा वध करून सुरेंद्राची मुक्तता तुला सहज करतां येईल.

**काम०**—नाहीं—मला तुझ्याबरोबर तुझ्या छावणींत येतां येत नाहीं. मला कांतारांच्या छावणींतच परत गेलें पाहिजे. उद्दामकेतु रणांत मारला जाणें मला शक्य वाटत नाहीं. त्याचा कपटानेंच वध केला पाहिजे. कल्पलते,—

पद—श्रमाना गणी०—

**शठता शठा ॥ हालाहलाचा मधुमुखि घट जो ॥ वृथा सरलता ॥ त्या खटनटा ॥ धृ० ॥ खल कपटें अडवावा ॥ पदतलिं बडवावा तुडवावा ॥ सत्य हेंचि जनिं; ॥ आचार इतर फुकट खोटा ॥ १ ॥**

**कल्प०**—पण ताई, त्या सैतानाची सांवली फिरून तुझ्यावर पडली कीं तुझें मन पुनः भ्रष्ट होईल व तुझा हात शत्रूंच्या रक्ताऐवजीं मित्रांच्याच रक्तानें रण-मैदान भिजवून सोडील.

**काम०**—नाहीं—कल्पलते, नाहीं. या रणमैदानावर सांडलेल्या स्वातंत्र्य-वीरांच्या पवित्र रक्ताचीच शपथ घेऊन मी तुला सांगतें कीं यापुढें या हातानें कैरवांच्या रक्ताचा एक थेंबही जमिनीवर सांडला जाणार नाहीं. तो आतां उद्दाम-केतूच्या रक्ताकरितांच राखून ठेवलेला आहे; व तो तें लौकरच सांडल्याशिवाय राहणार नाहीं.

**कल्प०**—तुझे हे शब्द ऐकून माझें मन हर्षानें उचंबळून येत आहे. ताई, सुरेंद्रांची मुक्तता होऊन उद्दामकेतूचा तुझ्या हातून वध झाल्याची वार्ता माझ्या कानीं लौकर पडेल, अशी मला आशा आहे.

**काम०**—तुझी आशा निःसंशय सफल होईल, कल्पलते, तुझ्या छावणींत विश्वासघाताचा वृक्ष फोंफावत चालला आहे. राजमंडळांतील राजे शत्रूला फितूर झाले आहेत व ते तुम्हाला केव्हां दगा देतील याचा नेम नाहीं. तेव्हां आतां छावणींत तावडतोब परत जा व त्यांच्या बंदोबस्ताला लाग. जा, निष्कारण येथें वेळ घालवूं नकोस.

**कल्प०**—ठीक आहे. येतें मी. ताई—

पद—सुयश देवो.—

**सफल होवो मनकामना ।। बल प्राप्त हो खल-शासना ।।धृ०।। स्वकुल-जन-हननें लांछिला ।। युवतिकर विमल जो आपुला ।। रिपु-रुधिर-सलिलें न्हाणिला ।। वंद्य होशिल तरी निजकुला ।। अभयदानें अखिला जना ।। १ ।।**

( कल्पलता जाते. )

**काम०**—( स्वगत ) बस्. आतां यापुढें या चित्ताला एकच विषय !

—पद—तारिणी नववसन धारिणी०—

**मानसा रिपु-रुधिर-लालसा ।। लाजवी सुरसरगुणें जें ।। मधुर सुधा सरसा ।। धृ० ।। चरचरा चिरितां शिरा ।। वाहतां रक्त-धारा ।। अंजली भरुनि सारा ।। भीम-धृति धरिन । घोर कृति करिन । काल-मद हरिन । खासा ।। १ ।। आप्त-वध-खर-लांछना ।। हरुनि यश-संपादना ।। एक सन्मार्ग हा ।। उचित सर्वदा । खरा बलसाहसा ।। २ ।।**

—जाते—

---

## प्रवेश ३ रा.



कैरवांची छावणी. ध्वजासनाचा देखावा.

( राजमंडळांतील राजे फितुरीचें कारस्थान करीत आहेत ).

**१ राजा**—नाहीं-नाहीं-तुम्ही कितीही आग्रह केलात, तरी सेनापति-पदाचीं जबाबदारी प्राण गेला तरी मी आपल्या शिरावर घेणार नाहीं. तुम्हांला

आपले जावे नकोस झाल असतील तर तुम्ही वाटेल तर खुशाल ती आपल्या शिरावर घ्या आणि आनंदानें कुत्र्याच्या मोतीनें मरा. मला माझा जीव कांहीं अजून इतका जड झालेला नाहीं. शिवाय लोकसत्तेच्या समंधाला आपण होऊन आपल्या मानगुटीवर कोण बसूं देईल ? कैरवांची आजची दुर्दशा पाहून या युद्धांतून आपलें अंग काढून घेण्याचा माझा अगदीं ठाम निश्चय झालेला आहे. राणी कल्पलता आणि आचार्य आतां येथें आले म्हणजे हें युद्ध बंद करण्याविषयीं मी त्यांना निक्षून सांगणार आहें.

**२ राजा**—पण त्यांनीं आपलें म्हणणें ऐकलें पाहिजे ना ?

**१ राजा**—अलबत्. ऐकलेंच पाहिजे. लढणारे जर आपण आहोंत तर लढणें न लढणें हें आपल्याच खुषीवर अवलंबून असलें पाहिजे. मरण्याला आम्ही आणि चरण्याला दुसरे, हा धंदा मी शिकलों नाहीं. त्यांना ही गोष्ट मी बजावणार आणि त्यांनीं तिच्याकडे दुर्लक्ष केलें कीं तडक आपल्या सैन्यासह बेधडक आपल्या घरचा रस्ता सुधारणार. कोणाचाही भीडमुलाजा ठेवणार नाहीं.

**२ राजा**—पण आपणच घरचा रस्ता सुधारल्यावर आम्ही तरी मागें राहून करणार काय ? आपल्या बळावर तर आमच्या साऱ्या उड्या ! आपण नाहीं म्हणजे आम्ही असून नसल्यासारखेच आहोंत !

**१ राजा**—तर मग तुम्हींही माझ्याबरोबर चला. ही वेळ आहे. या वेळीं प्राण वांचविलेंत तर जगाल. नाहीं तर दोन दिवसांच्या आंत स्मशानाचा रस्ता खात्रीनें तुम्हाला खुला होणार आहे. आतां कोणी कितीही जंगजंग पछाडलें तरी उद्दामकेतु कांहीं कोणाला आटोपत नाहीं. तो आतां आजिंक्य झाला आहे. अमर झाला आहे.

**२ राजा**—पण आम्ही आतां धर्मयुद्धांतून अलग झालों तर उद्दामकेतु आमच्या वाटेला जाणार नाहीं, अशी हमी घेण्याला आपण तयार आहांत का ?

**सर्व राजे**—हो-हमी पाहिजे !

**१ राजा**—अलबत्. माझ्याबरोबर आतांच्या आतां तुम्ही बाहेर पडलांत तर उद्दामकेतूकडून तुमच्या केंसालाही धक्का पोंहोंचणार नाहीं, अशी हमी घेण्यास मी तयार आहें. त्याच्याकडून आज मला तसें अगदीं स्पष्ट आश्वासन मिळालें आहे.

**३ राजा**—तर मग आम्हीही आपल्या पावलावर पाऊल टाकण्याला तयार आहोंत. आपण आमचे पुढारी. आपण या युद्धांत पडलांत म्हणून आम्ही ससैन्य लढाईच्या मैदानावर येऊन दाखल झालों. पण आतां आपणच घर जवळ करावयास तयार झाल्यावर, आम्हांला तरी घर दूर ठेवण्याचें कारण काय? जिकडे आपण तिकडे आम्ही. आतां राणी कल्पलता आणि आचार्य इकडे आल्यावर आपल्याप्रमाणेंच आम्हीही हें युद्ध बंद करण्याबद्दल त्यांना आग्रह करणार आणि त्यांनीं आमच्या मताला धुडकावून लावलें कीं आपल्या मागोमाग तडक आपल्या घराचा रस्ता धरणार!

**१ राजा**—कशी अगदीं लाखाची गोष्ट बोललांत! आपण राजे आहोंत आणि आपल्या राष्ट्रांच्या जीवितरक्षणाची आपल्यावर जोखीम आहे. तेव्हां आपण तिला डोळ्यांत तेल घालून जपलें पाहिजे. आपण जर फुकटाफुकटी आपल्या लोकांच्या प्राणाची अशी बेगुमानपणें खैरात करूं लागलों तर देवाच्या दरबारांत आपली क्षणभरही गय केली जाणार नाही. 'राष्ट्रघातकी' म्हणून सरळ नरकांत आपली रवानगी केली जाईल. दाक्षिणात्य राजमंडळांत आजपर्यंत केव्हांही फूट पडली नव्हती. ती आतां अशा आणीबाणीच्या प्रसंगीं पडते कीं काय, असें मला भय पडलें होतें. पण तुमच्या शहाणपणामुळें ते टळलें याबद्दल तुम्हाला धन्यवाद द्यावेत, तेवढे थोडेच आहेत.

**३ राजा**—हें सारें आपलेंच श्रेय आहे. आपण वेळींच जागवलेंत म्हणून आम्ही जागे झालों. नाही तर अखेरपर्यंत असेच घोरत पडलों असतों; आणि झोंपेंत आमचे प्राण केव्हां निघून गेले असते, हें आम्हाला उठल्यानंतर कळलेंही नसतें. तेव्हां आपण आमचे आभार न मानतां आम्हींच आपले आभार मानले पाहिजेत. ( कल्पलता प्र० क० ).

**कल्प०**—भूपालहो, सुरेंद्रांच्या जागीं सेनापतिपदासाठीं आपण कोणाची योजना केली आहे?

**१ राजा**—कोणाचीही नाहीं.

**कल्प०**—कोणाचीही नाहीं? कां? आतां वेळ अगदीं थोडा राहिला आहे. तेव्हां आपल्याला तावडतोब कोणाला तरी आतां सेनापति निवडलेंच पाहिजे.

**१ राजा**—निवडलेंच पाहिजे खरें. पण ही जबाबदारी शिरावर घेण्यास राजमंडळांतील कोणीही सभासद तयार नाहीं.

**कल्प०**—तयार नाहीं! कां तयार नाहीं?

**१ राजा**—यापुढें युद्धच बंद करण्यांत यावें, असा राजमंडळाचा अभिप्राय आहे.

**कल्प०**—काय! युद्धच बंद करण्यांत यावें असा राजमंडळाचा अभिप्राय आहे?

**१ राजा**—होय. यापुढें धर्मयुद्धाचा भार आपल्या शिरावर घेण्यास राजमंडळ बिल्कुल तयार नाहीं.

**कल्प०**—कां! राजमंडळाला ही जबाबदारी घेण्याची एवढी भीति कां वाटते?

**१ राजा**—भीति वाटत नाहीं. परंतु यापुढें या युद्धांत भाग घेणें ही अनीति आहे–अन्याय आहे–अधर्म आहे–असा राजमंडळाचा अभिप्राय आहे.

**कल्प०**—आश्चर्य आहे. धर्मयुद्धांत धर्मपक्षाच्या वतीनें लढणें ही अनीति आहे–अन्याय आहे–अधर्म आहे, हा अजब सिद्धान्त आज मी नव्यानेंच ऐकत आहे.

**१ राजा**—परंतु सध्यांचें हें मुळीं खरें धर्मयुद्धच आम्हांला वाटत नाहीं; आणि आपला पक्ष हा तर धडधडीत अन्यायी पक्ष आहे, अशी आमची अनुभवानें आतां बालंबाल खात्री होऊन चुकली आहे.

**कल्प०**—दुष्कृतांपासून सत्कृतांचें संरक्षण करण्यासाठीं पुकारण्यांत आलेलें युद्ध हें धर्मयुद्ध नाहीं असें म्हणणें, आणि धर्मविध्वंसकांचं पारिपत्य करून स्वधर्म-संस्थापना करूं पहाणाऱ्या पक्षाला अन्यायी पक्ष म्हणून दोष लावणें, हा मूढपणा-चीच नव्हे तर दुष्टपणाची कमाल आहे.

**१ राजा**—दुष्कृतसत्कृतांचें हें शुद्ध ढोंग आहे!

**२ राजा**—सद्धर्म संस्थापना ही निव्वळ फसवेगिरी आहे!

**३ राजा**—आजच्या युद्धाच्या मुळाशीं कोणताही उच्च आणि उदात्त हेतु नाहीं!

**१ राजा**—कपटानें घशांत टाकलेलें राज्य कायमचें पचनीं पाडण्यासाठीं हा सारा खटाटोप उभारण्यांत आला आहे!

**कल्प०**—आपण काय बोलत आहांत, याची आपणांला कांहीं शुद्ध आहे का?

**१ राजा**—होय, डोळ्यांवरची झांपड उडून शुद्धीवर आल्यामुळेंच मी हें बोलत आहे.

**कल्प०**—भूपाल हो, तुम्ही खरोखरच शुद्धीवर असतां, तर असले निरर्गल प्रलाप तुमच्या मुखांतून केव्हांही निघाले नसते.

**२ राजा**—हे निरर्गल प्रलाप नाहींत–हें मूर्तिमंत सत्य आहे.

**३ राजा**—आणि राजमंडळांतील भूपालांना तें तंतोतंत पटलेलें आहे.

**कल्प०**—शत्रूचे युक्तिवाद मित्र उच्चारूं लागले म्हणजे त्यांना मित्र समजावें कीं शत्रु समजावें, हा मोठा प्रश्न आहे.

**३ राजा**—म्हणजे! आम्ही शत्रूला फितूर झालों आहोंत, असें आपलें म्हणणें?

**कल्प०**—होय. असेंच माझें म्हणणें आहे. अशा ऐन आणीबाणीच्या वेळीं शत्रूनें लढविलेले युक्तिवाद अकस्मात् पुढें मांडून तुम्ही आमचा असा केसानें गळा कापण्यास तयार झालां आहांत; तेव्हां तुम्हांला शत्रूची फूस मिळाली आहे–तुम्ही शत्रूला फितूर झालां आहांत–असें मी कां म्हणूं नये?

**१ राजा**—अशी निराधार शंका घेऊन आपण आमचा अपमान करीत आहांत!

**कल्प०**—माझ्या शंकेनें आपला नुसता अपमानच होत असेल; पण तुमच्या या कृत्यानें आमचा अपमानच नव्हे तर नाश होण्याची पाळी येणार आहे, याची तुम्हांला काहीं जाणीव आहे कां? सर्पाप्रमाणें तुम्हाला आमच्याबर असें उलटावयाचेंच होतें तर पहिल्यानेंच तुम्ही आमच्यापासून चार पावलें दूर रहावयास पाहिजे होतें! आम्ही काहीं तुमच्या पाठीवर हीं धर्मयुद्धाची गोणी बलात्कारानें खास लादली नसती. पण आपखुषीनें प्रतिज्ञा करून आमचा पक्ष स्वीकारल्यावर, आतां ऐन निकराच्या प्रसंगीं शत्रूच्या चिथावणीनें आमच्या मानेवर अशी सुरी चालविण्यास तयार होणें, हा शुद्ध राक्षसीपणा आहे.

**१ राजा**—यांत राक्षसीपणा कसला? हें मतस्वातंत्र्य आहे! आणि मत-स्वातंत्र्य हा प्रत्येकाचा जन्मसिद्ध हक्क आहे. राजमंडळाला हें युद्ध नको आहे आणि त्याची जबाबदारी शिरावर घेण्याची त्यांची बिलकुल इच्छा नाहीं.

**२ राजा**—तेव्हां राजमंडळाच्या मताला मान देऊन, हें अनीतिमूलक

अन्याय्य युद्ध आपण बंद करणार किंवा नाहीं याचा आम्हाला सरळ आणि स्पष्ट जबाब द्या.

**कल्प०**—युद्ध केव्हांही बंद केलें जाणार नाहीं.

**१ राजा**—पहा–राजमंडळाच्या मताचा असा अनादर करणें परिणामीं आत्मघातकी ठरेल, हें लक्षांत ठेवा.

**कल्प०**—राजमंडळ आत्मघातकी उपदेश करूं लागल्यास त्याच्या उपदेशाचा अनादर करणेंच भाग आहे. राजमंडळाला आपल्या मताला मान मिळावा अशी इच्छा असेल, तर त्यानें आपल्या प्रतिज्ञेचें स्मरण करून परप्रेरणेनें बनलेल्या आपल्या आत्मघातकी मतांत दुरुस्ती करावी.

**१ राजा**—छे–पूर्ण विचारांतीं ठरलेल्या मतांत आतां दुरुस्ती होणें शक्य नाहीं.

**कल्प०**—तर मग त्याला मान मिळणेंही शक्य नाहीं.

**सर्व राजे**—काय ? शक्य नाहीं ?

**कल्प०**—नाहीं–शक्य नाहीं.

**१ राजा**—( रागानें ) राणीसाहेब, उद्दामपणानें राजमंडळाच्या मताची आपल्याला अशी पायमल्ली करावयाची असेल, तर राजमंडळाचा व आपला स्नेह-संबंध या क्षणापासून तुटला म्हणून समजा. यापुढें राजमंडळ आपलें कोणी नाहीं व आपण राजमंडळाच्या कोणी नाहीं.

**३ राजा**—लोकनिर्णयाचा डांगोरा पिटणारेच स्वतः लोकनिर्णयाची अशी गळचेपी करूं लागल्यावर त्यांच्या वाऱ्याला तरी उभें राहण्याचें आम्हांला कारण काय ?

**२ राजा**—उद्यां आमच्यापैकीं रणांगणावर आपणाला कोणीही दृष्टीस पडणार नाहीं. आम्ही सर्व आपापल्या सेना घेऊन आतांच्या आतां स्वदेशाकडे कूच करणार. चला. ( जाऊं लागतात. धर्मानंद व संन्यासी प्र० क० ).

**धर्मा०**—काय गडबड आहे ? कसली दंगल माजली आहे ?

**कल्प०**—राजमंडळांतील भूपाल धर्मयुद्ध टाकून स्वदेशीं परत जाण्यास निघाले आहेत.

**१ राजा**—जेथें आमच्या मताला काडीचाही मान नाहीं, तेथें रहाण्याची आम्हाला जरूर काय ?

**धर्मा०**—तुमच्या मताचा अनादर कोणीं केला ?

**२ राजा**—राणी कल्पलतेनें केला.

**कल्प०**—होय-मी केला. आणि तो मी केव्हांहीं करणारच.

**सर्व राजे**—काय ? करणारच ?

**कल्प०**—होय-करणारच.-शत्रूच्या चिथावणीनें युद्ध बंद करण्याचा उपदेश मला कोणी करूं लागला तर त्याच्या त्या मानभावी उपदेशाला मी केव्हांहीं मान देणार नाहीं.

**राजा**—शत्रूच्या चिथावणीचा हा आमच्यावरलि आरोप अजिबात खोटा आहे.

**सर्व राजे**—होय. अजिबात खोटा आहे.

**१ राजा**—युद्ध बंद करण्यांत यावें, असा आमचा सर्वांचा अभिप्राय आहे. पण तो स्वतंत्र आहे. त्यांत शत्रूचा कांहीं एक संबंध नाहीं आणि तो अमान्य करण्यांत आल्यास अतःपर या युध्दांत भाग घ्यावयाचा नाहीं, असा आम्ही निश्चय केला आहे.

**धर्मा०**—हा निश्चय फितुरीचा नसला तरी मूढपणाचा आहे. हें युद्ध तुमच्याच संमतीनें आणि केवळ तुमच्याच कल्याणाकरितां पुकारण्यांत आलेलें आहे व तें अखेरपर्यंत निकरानें चालविण्याची तुम्ही प्रतिज्ञा केले आहे. तेव्हां एकाएकीं तुम्ही असा निश्चय करणें म्हणजे नुसतें घोर लांछनच नव्हे, तर भयंकर पातक आहे. तुम्हाला हें युद्ध चालविलेंच पाहिजे आणि आपल्या प्रतिज्ञेचें पालन केलेंच पाहिजे.

**१ राजा**—नाहीं-आमच्या इच्छेविरुद्ध कोणी आमच्यावर बलात्कार करूं लागला तर तो आम्ही साफ चालूं देणार नाहीं.आम्हाला यापुढें युद्ध नको आहे आणि आमच्या मताला पायाखालीं तुडवून तें असेंच दुराग्रहानें चालूं ठेवण्यांत आल्यास आम्ही त्यांत कोणत्याही प्रकारचा प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष भाग कदापि घेणार नाहीं.

**धर्म०**—भूपाल्हो, हा आततायीपणा चांगला नाहीं. स्वमताचा अभिमान बाळगणें हें पौरुषाचें लक्षण असलें तरी स्वमताच्या नांवाखालीं प्रतिज्ञेपासून भ्रष्ट होणें हें पौरुषाचें लक्षण खास नाहीं. हा दुबळेपणा आहे; आणि त्यांतही असत्य व आत्मघातकी स्वमताचा आग्रह धरून स्वपक्षाचा विश्वासघात करण्यास तयार होणें,

म्हणजे या अधमपणाला तर जगांत तोड नाहीं. तेव्हां असे एकदम हातघाईवर येऊं नका. थोडे शांत व्हां. आपण काय करीत आहोंत व त्याचे परिणाम काय होणार आहेत, याचा चांगला विचार करा. तुमच्या निश्चयाशीं कदाचित् शत्रूचा कांहीं संबंध नसेलही. पण तो शत्रूला परिणामीं हितकारक आहे,एवढी गोष्ट तरी तुम्हाला कबूल केलीच पाहिजे. तेव्हां शत्रूला हितकर होणाऱ्या गोष्टी करणें हें वाजवी आहे का हें आपण आपल्या मनाशीं एकदां नीट तपासून पहा. धर्मयुद्धाची स्थिति या वेळीं अत्यंत नाजुक आहे आणि धर्मपक्षाला तुमच्यासारख्या समरधुरंधर वीरांच्या सहाय्याची अत्यंत जरूरी आहे. तेव्हां अशा वेळीं आपण असा भलताच आग्रह धरून बसणें आपल्यासारख्या थोरांना उचित नाहीं.

**कल्प०**—पण हें धर्मयुद्ध आहे व आपला धर्मपक्ष आहे, हेंच यांना आंता मुळीं मान्य नाहीं. कपटानें घशांत टाकलेलें राज्य कायमचें पचवून टाकण्यासाठीं आपण हा सारा खटाटोप उभारला आहे, असा यांचा आपल्यावर आरोप आहे.

**१ राजा०**—होय. असाच आपल्यावर आमचा आरोप आहे; आणि म्हणूनच आम्ही यापुढें आपल्याशीं कोणत्याही प्रकारचा संबंध ठेवूं इच्छित नाहीं.

**धर्मा०**—तर मग हें शत्रूचेंच कपट आहे, यांत आम्हांला आंता मुळींच शंका वाटत नाहीं. आजच्या आमच्या पराभवाचा फायदा घेऊन शत्रूनें तुम्हाला घेरण्यासाठीं आपलें जाळें पसरलें आहे आणि त्यांत तुम्ही सारे फसलां आहांत, हें अगदीं स्पष्ट आहे. परंतु भूपालहो, तुम्हाला पुढें करून उद्दामकेतूनें आमच्यावर जो हा डाव केला आहे तो आम्ही केव्हांहीं यशस्वी होऊं देणार नाहीं. त्यानें लढविलेल्या भ्रामक युक्तिवादांनीं क्षणमात्र तुमच्या मनाला मोह पडला असला तरी तो तुम्हाला शेंवटीं झाडून टाकावाच लागेल. कदाचित् तुमच्या म्हणण्याप्रमाणें हें धर्मयुद्ध नसेल व आमचा धर्मपक्षही नसेल; परंतु सध्यांच्या युद्धांत आमचा पक्ष विजयी होण्यावर तुम्हां सर्वांचें जीवित व स्वातंत्र्य सर्वस्वी अवलंबून आहेत, ही गोष्ट तुम्हांला विसरून चालणार नाहीं. आमचा पक्ष विजयी झाल्यानें कैरवांचें राज्य कल्पलतेच्या कदाचित् पचनीं पडेल. पण त्यामुळें तुमच्या राज्यांना खात्रीनें धोका पोहोंचावयाचा नाहीं; तीं सुरक्षित रहातील. पण तुमच्या या मूढपणाच्या कृतीनें विजयश्रीनें उद्दामकेतूच्या गळ्यांत माळ घातली तर मात्र कैरवांच्या

बरोबर तुमचीं राज्येंही रसातळाला जाण्यास क्षणाचाही अवधि लागावयाचा नाहीं. तुम्हांला आमच्यांतून अलग काढून आमचा पक्ष दुर्बल करण्यासाठीं उद्दामकेतूनें आज तुम्हांला वाटेल तीं आश्वासनें दिलीं असतील! पण आमचा कांटा वाटेंतून दूर होतांच तीं सर्व गुंडाळून ठेवून तो तुमच्याही छातींत गुलामगिरीचा खंजीर खुपसण्यास कमी करणार नाहीं हें पक्कें जाणून ठेवा.

**१ राजा**—पुढचें पुढें पहातां येईल. त्याची फिकीर आतां करण्याचें आम्हांला कांहीं कारण नाहीं. या वेळीं आम्हांला युद्ध बंद व्हावयास पाहिजे आहे व तें करण्यास आपण तयार आहांत किंवा नाहीं, एवढें आम्हांला सांगा.

**धर्मा०**—छे-धर्मयुद्ध बंद होणें शक्य नाहीं. कोणत्याही हालतींत तें चालूंच रहाणार आणि तेंही अधिक निकरानें चालू रहाणार. प्रबलांच्या जुलमापासून दुर्बलांचें रक्षण करण्यासाठीं धर्मानें रणांगणावर टाकलेलें पाऊल, प्रबलांच्या जुलमाचा समूळ उच्छेद किंवा स्वतःचा सर्वस्वनाश झाल्यावांचून कदापि मागें घेतलें जाणार नाहीं.

**१ राजा**—आमचा अपमान करून आमचें सहकार्य झिडकारल्यावर आचार्यांचा पक्ष लंगडा होऊन-धुळीला मिळेल, हें आचार्यांनीं लक्षांत घेतलं पाहिजे.

**धर्मा०**—भूपालहो, तुम्हीच तेवढे जगांत पुरुष आहांत व बाकीच्यांनीं हातांत कांकणें भरलीं आहेत, असें लमजूं नका. तुम्हालाही मर्दुमकीचे धडे शिकवतील, असे हजारों तलवारबहाद्दर आज आनंदखंडांत नांदत आहेत. तेव्हां तुम्ही जरी धर्माशीं असहकार केलात तरी धर्माची ललकारी ऐकून अजूनही हजारों धर्मवीर धर्मसेवेप्रीत्यर्थ धर्मध्वजाभोंवतीं रणांगणावर आपल्या पंचप्राणांचें बलिदान करण्यास आनंदानें येऊन दाखल होतील आणि धर्मपक्षाचें बल अभंग राखतील, हें खूप समजून असा.

**१ राजा०**—आचार्यांचा हा निव्वळ भ्रम आहे. आम्ही खालीं ठेवलेली तलवार फिरून उचलण्यास आनंदखंडांतील एकही क्षत्रिय तयार होणार नाहीं.

**धर्मा०**—पण क्षत्रियांनीं खालीं ठेविलेली तलवार क्षत्रियांनींच उचलली पाहिजे असा कांहीं शास्त्रार्थ नाहीं. धर्मसंरक्षणार्थ तलवार धारण करण्याचा सर्व वर्णांना सारखाच अधिकार आहे.

**१ राजा**—पण सर्व वर्णांपैकींही कोणी हें साहस करण्याला तयार होईल, अशी आशा करणें व्यर्थ आहे.

**धर्मा०**—पर्वा नाहीं. आनंदखंडांतील सर्व वर्ण धर्मयुद्धापासून विन्मुख झाले तरी आपल्या तपोबलानें सर्व वर्णांना आपल्या पायांवर नाक घासावयास लावणारे हजारों समर्थ संन्यासी आज आनंदखंडांत वावरत आहेत. ते सर्व आपले दंडकमंडलू झुगारून धर्मसेवेप्रीत्यर्थ तलवार हातांत घेऊन रणांगणावर येऊन दाखल होतील. क्षत्रियांचाच तलवारीशीं परिचय आहे आणि संन्याशाला तलवारीची नुसती तोंडओळख देखील नाहीं, असें समजूं नका.

**२ राजा**—पण नुसती तलवार हातांत धरून उपयोग काय? ती रणांगणांत नाचविण्यासाठीं मनगटांत ताकद पाहिजे.

**धर्मा०**—संन्याशाच्या मनगटांत ही ताकद केव्हांही असते. त्यानें शस्त्रसंन्यास केलेला असला तरी शक्तिसंन्यास केलेला नसतो. किंबहुना ही शक्ति परमोत्कर्षानें ज्याच्या मनगटांत नसेल, तो खरा संन्यासीच होऊं शकत नाहीं. कारण संन्यास हा मर्दांचा धर्म आहे–नामर्दांचा धर्म नाहीं. ही शक्ति सदैव मनगटांत खेळत असूनही तो शस्त्रास कधीं स्पर्श करीत नाहीं, हें त्याचें औदार्य आहे–हें त्याचें पावित्र्य आहे. पण तेवढ्यावरून, तो अशक्त आहे–भीरु आहे, असं समजूं नका. तो धैर्याचा मेरु आणि शौर्याचा सागर आहे. त्याच्या सामर्थ्याला जगांत सीमा नाहीं. त्याला तुमची ही यःकश्चित तलवारच काय, पण इंद्राचें वज्र, विष्णूचें सुदर्शन अगर शंकराचा त्रिशूळ हीं सुद्धां खेळणींच आहेत. त्याला पेलणार नाहीं असें एकही शस्त्र अगर एकही अस्त्र जगांत नाहीं. कलिकाळावर जय मिळविणारे त्याचें मनगट प्रथमदर्शनीं किती दुर्बल भासलें तरी शस्त्राला स्पर्श करण्याची इच्छा त्याच्या चित्तांत उद्भवतांच त्याच्या ठिकाणीं जगांतील सर्व शस्त्रास्त्रें सहज लीलेनें खेळविण्याचें सामर्थ्य क्षणांत प्रगट होतें. तेव्हां अशा सर्वसंगपरित्यागी निर्भय संन्यासवीरांचा पंथ पृथ्वीच्या पाठीवर जिवंत नांदत आहे, तोंपर्यंत, धर्मपक्षाचा एक वाल वांकडा करण्याची तुमचीच काय, पण कृतांत काळाचीही छाती नाहीं, हें पक्कें लक्षांत ठेवा.

**कल्प०**—परंतु भूपालहो, आनंदखंडांतील तुम्ही क्षत्रिय जिवंत असतां सर्वसंगपरित्यागी संन्याशांना धर्मसेवेप्रीत्यर्थ आपलें दंडकमंडलु टाकून धर्मयुद्धांत शस्त्र धारण करण्याची पाळी यावी, हें तुम्हांला लांछनास्पद आहे. प्रबलांपासून दुर्बलांचें रक्षण करणें हा सनातन क्षात्रधर्म आहे आणि त्यापासून परावृत्त होणें हा तुमचा व तुमच्या कुलाचा अधःपात आहे.

**१ राजा**—पण आतां संन्यासी क्षात्रधर्म स्वीकारून तलवार गाजविण्यास तयार झाले आहेत. मग आमची जरूरी काय?

**१ संन्यासी**—आपद्धर्म म्हणून लोकसंग्रहार्थ क्षात्रधर्मच काय, पण शूद्र-धर्मही संन्यासी स्वीकारील. तें त्याचें कर्तव्य आहे व तो त्याचा अधिकारही आहे.

**कल्प०**—परंतु अशा आपत्तींत क्षत्रियांनीं संन्याशाला पाडणें हा मात्र परमथोर क्षात्रधर्माचा उच्छेद आहे. तेव्हां नका–मी तुम्हांला प्रार्थना करतें कीं, नका–या अघोर कर्माला प्रवृत्त होऊं नका. धर्मसंरक्षणार्थ संन्याशांनीं तलवार धरावी व क्षत्रियांनीं हातांत कांकणें भरून अंतःपुरांत दडून बसावें, हें दृश्य आपली अधोगति दर्शविणारें आहे.

**धर्मा०**—भूपालहो, मी पुनः आपल्याला सांगतों–अगदीं कळकळीनें विनवून–पदर पसरून सांगतों कीं नका–धर्मसेवेचा त्याग करून इहलोकीं अपकीर्ति, आणि परलोकीं दुर्गति यांचीं जोड करून घेऊं नका. धर्म तुमच्यावांचून केव्हांही रसातळाला जाणार नाहीं. परंतु धर्मत्यागामुळें तुमचा मात्र परिणामीं सर्वस्वनाश होईल हें लक्षांत ठेवा. व्हा–सावध व्हा. भलत्याच आत्मघातकी दुराग्रहाला बळी पडून अधोगतीच्या मार्गावर पुढें पाऊल टाकूं नका. त्यांत तुमचें कल्याण नाहीं–त्यांत तुमचा उद्धार नाहीं. घ्या–ही तलवार घ्या–या धर्मयुद्धाच्या सेनापतिपदाचा स्वीकार करा–आणि धैर्यानें धर्मध्वजाच्या रक्षणासाठीं रणांगणावर दाखल व्हा.

**कल्प०**—भूपालहो, आचार्यांच्या आज्ञेचा भंग करूं नका–विनंतीचा अव्हेर करूं नका. धर्मरक्षणार्थ धर्मसिंहासनाधिपतींनीं तुमच्यापुढें पदर पसरावा आणि तुम्ही त्यास पाठमोरे व्हावें हें तुम्हांस भूषणावह नाहीं. अशा याचकानें आशी याचना केली असतां ती पूर्ण करणें, हाच क्षात्रकुलाचा आजवरचा शिरस्ता आहे.–सदाचार आहे. तेव्हां या–आचार्यांच्या शब्दाला मान देऊन तुमच्यापैकीं कोणी तरी पुढें या–आणि ही सेनापतीची तलवार ग्रहण करा. हा श्रेष्ठ मान आहे–हें थोर भाग्य आहे.

**१ राजा**—पण आम्हाला त्याची बिलकुल जरूर नाहीं.

**धर्मा०**—जरूर नाहीं? कां जरूर नाहीं? तुम्ही क्षत्रिय आहांत आणि युद्ध

हा तुमचा परम पवित्र धर्म आहे. तेव्हां युद्धाच्या नेतृत्वाचा मान तुम्हाला प्राप्त झाला असतां त्याचा स्वीकार करणें, हें तुमचें ब्रीद आहे.

**कल्प०**—म्हणून मी पुनः हात जोडून तुम्हाला प्रार्थना करितें कीं या-तुमच्यापैकीं कोणी तरी धैर्यानें पुढें सरसावून धर्मसंरक्षणाप्रीत्यर्थ ही तलवार घ्या आणि आपला व आपल्या क्षात्रकुलाचा यशोदुंदुभि दिगंत गाजवा. या-पुढें या-आणि ही तलवार घ्या.—

**१ राजा**—नाहीं-या तलवारीला आम्ही स्पर्श करणार नाहीं.

**धर्मा०**—स्पर्श करणार नाहीं?-या तलवारीला स्पर्श करणार नाहीं?

**सर्व राजे**—नाहीं.

**धर्मा०**—या क्षात्रकुलदेवतेचा सत्कार करणार नाहीं?

**सर्व राजे**—नाहीं.

**धर्मा०**—या सद्धर्मशक्तीचा स्वीकार करणार नाहीं?

**सर्व राजे**—नाहीं-नाहीं-नाहीं-त्रिवार नाहीं.

**धर्मा०**—तर मग मुर्दाडांनों, चला-चालते व्हा. तुमच्यासारख्या नामर्द-नादान क्षत्रियांच्या मदतीवांचून हें धर्मयुद्ध बंद पडेल, असें समजूं नका. कल्पलते, आण-ती सेनापतीची तलवार इकडे आण. हा संन्याशांचा संन्यासी आपला दंडकमंडलु झुगारून प्रबलांपासून दुर्बलांचें रक्षण करण्यासाठीं या तलवारीचा आज स्वीकार करीत आहे. आण-ती तलवार इकडे आण. आजपासून या धर्मयुद्धाच्या सेनानायकत्वाची जबाबदारी आम्ही आपल्या शिरावर घेतली आहे. (संन्याशांकडे वळून) सन्मान्य यतिजनहो, धर्मसंरक्षणाची जबाबदारी ज्यांच्या शिरावर आहे त्यांनीं ती आज झुगारून दिली असून ते आज धर्मविध्वंसनाच्या पातकाला सिद्ध झाले आहेत. परंतु त्यांनीं धर्माचा असा धिःकार केला असला तरी धर्म हेंच ज्यांचें जीवन अशा आपणां यतींना धर्माचा होऊं पाहणारा उच्छेद स्वस्थ बसून पहाणें शक्य नाहीं. शस्त्रग्रहण हा यतींचा नित्य आणि सामान्य धर्म नाहीं हें आम्ही जाणतों. परंतु लोकांचा उच्छेद होऊं नये व धर्माचा नाश होऊं नये म्हणून आपत्काल समजून आज आम्ही शस्त्रधर्माचा स्वीकार केला आहे; आणि सद्धर्मसरक्षणाप्रीत्यर्थ अखिल आनंदखंडांतील सर्वसंगपरित्यागी संन्याशांनीं आपले दंडकमंडलु फेंकून शस्त्र धारण करावें अशी सर्वश्रेष्ठ धर्मसिंहासनाचे अधिपति या नात्यानें आमची आपणास सर्वांस जाहीर धर्माज्ञा आहे.

**सर्व सं०**—आचार्यांची आज्ञा आम्हांस शिरसावंद्य आहे. हे पहा. आम्ही आपले दंडकमंडलू फेंकून दिले! ( तसें करतात ).

**३ राजा**—अरे-अरे-अरे-अरे-यतिजनहो, हा यतिधर्माचा उच्छेद-संन्यासधर्माचा विध्वंस आहे!-

**धर्मा०**—धर्मभ्रष्टांनो, धर्मगुरूंना धर्मोपदेश करण्याच्या लांड्या कारभारांत पडूं नका. यतिधर्माचें ज्ञान तुमच्यासारख्या धर्महीन नतद्रष्टापेक्षां या धर्मनिष्ठांना अधिक आहे. तुमच्या पांडित्याची त्यांना जरूरी नाहीं. ज्ञानाग्नींत स्वार्थसर्वस्वाची होळी करून केवळ लोकसंग्रहार्थच जो जीवित धारण करून असतो, अशा निरहंकार, निर्ममक, निरपेक्ष संन्याशाच्या ठिकाणीं धर्मभंग आणि धर्मोच्छेद संभवतच नाहींत.

**१ संन्यासी**—आणि संभवलेच तर प्रबलांच्या जुलुमापासून दुर्बलांचें संरक्षण व्हावें म्हणून आमच्या हातून घडत असलेल्या या शस्त्रग्रहणरूप पातकाचें परमेश्वर नेमील तें प्रायश्चित्त भोगावयास आम्हीं मोठ्या आनंदानें तयार आहोंत. त्याबद्दल तुम्हां धर्मभ्रष्टांना फिकीर करण्याचें कांहीं एक कारण नाहीं.

**धर्मा०**—तेव्हां चला-आतां एक क्षणभर येथें उभे राहूं नका. तुमच्यासारख्या धर्मभ्रष्ट कर्मनष्ट रडतरावांची धर्मपक्षाला आतां बिलकुल जरूरी नाहीं. वास्तवीक तुमच्या या विश्वासघातकी वर्तनाबद्दल आम्ही तुम्हाला आतांच शासन घडवावयास पाहिजे होतें. परंतु तुमच्या स्वातंत्र्यावर गदा घालण्याची आमची इच्छा नाहीं. तुम्ही खुशाल येथून चालते व्हा. धर्मांत कांहीं चैतन्य असेल-कांहीं सामर्थ्य असेल-तर तो तुमच्या मदतीवांचूनही जगाच्या पाठीवर निःसंशय जिवंत राहील. उद्यापासून एका बाजूला सत्यनिष्ठ संन्यासी व दुसऱ्या बाजूला सत्यभ्रष्ट क्षत्रिय असाच देखावा धर्मक्षेत्र रणभूमीवर जगाच्या दृष्टीस पडेल, आणि संन्याशाचें मनगट बलवान् कीं क्षत्रियाचें मनगट बलवान् याचा निकाल संग्रामदेवतेच्या सिंहासनापुढें कायमचा लावला जाईल!

( धर्मानंदाचा जयजयकार ).

—पडदा पडतो. —

**अंक ३ रा समाप्त.**

---

# अंक ४ था.



## प्रवेश १ ला.



( उद्दामकेतूचा राजवाडा. उद्दामकेतु, तक्षक व सेनापति ).

**सेना०**—सरकार, या भगव्या फटिंगांनीं तर भयंकर कहर करून सोडला आहे. उभ्या जन्मांत शस्त्राचें नांवसुद्धां ज्यांनीं तोंडावाटें काढलें नसेल, ते शस्त्र हेंच ज्यांचें दैवत त्या आम्हां कांतार वीरांना इतके जर्जर करून टाकतीत, अशी मला कल्पनासुद्धां नव्हती.

**उद्दाम०**—पण आम्हाला त्याची बिलकुल फिकिर वाटत नाहीं. कांतारांतील झाडून सारे चंडमुंडचामुंड गोळा करवून त्यांच्या करवी आम्ही त्यांची सहज रग जिरवून टाकूं-सोडणार नाहीं.

**तक्षक**—बरोबर आहे. संन्याशाच्या डोक्यावर संन्यासीच मारला म्हणचे अनायासें कांट्यानें कांटा निघून जाईल.

**उद्दाम०**—पण आम्हाला खरी चिंता पडली आहे ती चंद्रकलेनें युद्धाविरुद्ध उभारलेल्या या बंडाळीची ! ती जर आम्हाला ताबडतोब मोडून टाकतां आली नाहीं तर कांतारांत यादवीचा वणवा पेटून कांतारांच्याच हातून कांतारांचा नाश होण्याची पाळी आल्यावाचून खात्रीनें रहाणार नाहीं,

**तक्षक**—सरकारांनीं माईसाहेबांना मोकळें ठेवलें, हीच मुळीं चूक झाली. त्यांनीं तलवार घेण्याचा इन्कार करतांच त्यांना एकदम काळदुर्गाचा रस्ता दाखवावयास पाहिजे होता.

**उद्दाम०**—पण ही कारटी एवढा उपद्व्याप करील व कांतारांतील चांगले चांगले म्हणविणारे लोकनायकसुद्धां हिच्या नादाला लागतील, असें आम्हाला स्वप्न कां पडलें होतें ?

**सेना०**—सरकार, झाल्या गोष्टी होऊन गेल्या ! पण आतां मात्र जालीम उपायाची योजना करण्यांत कसूर होतां उपयोगीं नाहीं.

**उद्दाम०**—आणि आतां आमच्या हातून तो होणारही नाहीं. आतांपर्यंत आमच्या अपत्यस्नेहानें आम्हाला जेथें तेथें असें फजीत केलें आहे.

पण आतां यापुढें तो पार झुगारून देण्याचा आमचा पक्का निश्चय झाला आहे.

**सेना०**—तर मग सरकारांनीं लष्करला हुकुम द्यावा, म्हणजे माईसाहेबांचा ताबडतोब बंदोबस्त होईल.

**उद्दाम०**—त्याचाच आम्ही विचार करीत आहोंत. ( सेवक येतो ).

**सेना०**—सरकार, धर्माधिपतींच्या स्वाऱ्या आल्या आहेत.

**उद्दाम०**—सेनापति, व्यवस्था चोख आहे ना ?

**सेना०**—अगदीं चोख आहे.

**उद्दाम०**—तक्षक, चला. त्या चामुंडाधिपतींच्या स्वागताला चला. ( उद्दाम० व तक्षक जातात )

**सेना०**—( हळूंच ) उत्पात—उत्पात—

**उत्पात**—( प्र. क. ) काय आज्ञा ?

**सेना०**—इषारा होतांच ठरल्याप्रमाणें कारवाई झाली पाहिजे. नाहीं तर डोकें उडविलें जाईल.

**उत्पात**—सेनापतींनी बेफिकीर असावें. या बंद्याचें डोकें हजर आहे.

**सेना०**—जा–हुषार रहा. ( उत्पात जातो. दुसऱ्या बाजूनें उद्दाम०, तक्षक, ज्ञानानंद, विद्यानंद, योगानंद प्र. क. )

**उद्दाम०**—आचार्यांनीं या आसनावर अधिष्ठित व्हावें. ( ते तसें करतात ).

**ज्ञाना०**—सम्राटा, तूंही आपल्या आसनावर बैस.

**उद्दाम०**—आचार्यांनीं आमच्या विनंतीचा काय विचार केला ?

**ज्ञाना०**—धर्मानंदाप्रमाणें शस्त्रधारण करून मनुष्यसंहाराच्या अत्याचाराला प्रवृत्त होणें आम्हाला बिलकुल मान्य नाहीं.

**विद्या०**—म्हणजे आम्ही युद्धाला भितों असें मात्र मुळींच नाहीं. युद्धच काय, पण महायुद्धाचीसुद्धां आम्हांला भीति वाटत नाहीं. परंतु युद्धाचा स्वीकार केल्यानें अहिंसाप्रधान यतिधर्माचा भंग होतो, म्हणून आम्हाला शस्त्रधारण करावयाचें नाहीं.

**उद्दाम०**—हरकत नाहीं. पण हिंसात्मक युद्धकर्माचा स्वीकार करणें आपणाला पसंत नसलें तर आपण शांतिप्रधान, अहिंसात्मक सत्याग्रहाचा अवलंब करून धर्मानंदाला शस्त्रसंन्यास करण्यास भाग पाडलेंत, तर तेंही आम्हाला कबूल आहे.

**ज्ञाना०**—सत्याग्रहाला आमची ना नाहीं. परंतु धर्मानंदासारख्या धर्मभ्रष्ट, कर्मभ्रष्ट चांडाळावर त्याचा कांहीं प्रभाव पडेल, असा विश्वास आम्हाला वाटत नाहीं.

**विद्या०**—आणि म्हणून असल्या निरर्थक खटाटोपांत पडून शक्तीचा व कालाचा वृथा अपव्यय करण्यांत कांहीं अर्थ नाहीं, असा आमचा अभिप्राय आहे.

**योगा०**—तेव्हां या दोन शर्तींशिवाय आम्हाला पसंत पडणारी व तुला हटकून गुण देणारी अशी तिसरी एखादीं रामबाण शर्त असेल तर सांग. म्हणजे तिचा आम्ही मोठ्या आनंदानें विचार करूं.

**ज्ञाना०**—पण या दोन शर्ती मात्र आम्हांला बिल्कुल मान्य नाहींत.

**उद्दाम०**—ठीक आहे. आमच्यापाशीं तिसरी रामबाण शर्तही तयार आहे. सेनापति—( सर्व बाजूंनीं नागव्या तलवारी घेतलेले शिपाई प्र० क० ).

**ज्ञाना०**—म्हणजे ? हें काय ?

**उद्दाम०**—ही तिसरी अचुक गुणकारी रामबाण शर्त. या शर्तीच्या अन्वयें हे शिपाई आपल्याला मोठ्या सन्मानानें कालदुर्गाचा रस्ता दाखवतील व तेथील सन्मान्य अधिकारी आपल्या श्रेष्ठ दर्जाला शोभेल, असें सत्कारपूर्वक आपलें आदरातिथ्य करतील.

**विद्या०**—म्हणजे ? तूं आम्हांला कालदुर्गावर कैद करून ठेवणार कीं काय ?

**उद्दाम०**—छे-छे आपल्यासारख्या थोर धर्माचार्यांना कैद करण्याचें पातक मी कसें करीन ? आपण श्रेष्ठ धर्मपीठाधिपति ! तेव्हां आजच्या आणीबाणीच्या प्रसंगीं आपल्या देहबलाचा नाहीं तर निदान आपल्या आत्मबलाचा तरी फायदा मला आपल्यापासून हवा आहे; आणि म्हणून तपश्चर्येसाठीं ही एकान्तवासाची व्यवस्था मी मुद्दाम आपणासाठीं केली आहे. कालदुर्ग ही अत्यंत प्रसन्न व प्रशांत जागा आहे; आणि मागील सर्व व्याप सुटल्यामुळें सर्वसंगपरित्यागपूर्वक संन्यास-धर्माचें पवित्र तपाचरण तेथें आपणाला निर्विघ्नपणें करितां येईल. संकटसमयीं तपोनिष्ठांच्या मार्फतीनें देवावर भार घालण्याचा हा शिरस्ता सर्वमान्यच आहे. तेव्हां आचार्य त्याला आपली असंमति दर्शविणार नाहींत, अशी मला उमेद आहे.

**ज्ञाना०**—उद्दामकेतू, तुझें हें कपटाचरण पाहून आमच्या आंगाचा अगदीं सात्विक संताप झाला आहे; आणि तुझ्या अत्याचाराचा आम्ही अत्यंत कठोर शब्दांनीं तीव्र पण सविनय निषेध करीत आहोंत.

**उद्दाम०**—मला आपला हा सविनय निषेध पूर्ण मंजूर आहे व त्याबद्दल मी आपला फार आभारी आहे.

**विद्या०**—उद्दामकेतू, तूं ही आमची थट्टा आरंभिली आहेस काय ?

**उद्दाम०**—छे बिलकुल नाहीं. माझ्या दोन शर्तीपैकीं कोणती तरी एक आपणांकडून मान्य होईपर्यंत मी खरोखरच आपणांकडून कालदुर्गांतील पुण्यपावन एकान्तवासांत जयप्राप्तीकरितां घोर तपश्चर्या करविणार आहे.

**योगा०**—धर्मगुरूंचा व धर्मसिंहासनांचा हा वडधडीत अपमान आहे.

**उद्दाम०**—आपल्या या विधानाला माझा बिल्कुल विरोध नाहीं.

**ज्ञाना०**—धर्मगुरूंचा हा छल लोकांच्या कानीं गेला, तर ते तुझ्यावर खवळून जातील !

**उद्दाम०**—मी त्यांची समजूत घालीन व त्यांचा रोष दूर करीन !

**विद्या०**—पण त्यांनीं तुला क्षमा केली तरी परमेश्वर तुला याबद्दल कडक शासनच करील !

**उद्दाम०**—आपल्यासारख्या नेभळटांचा पक्ष घेऊन मला शासन करण्याइतका परमेश्वर पागल आहे, असें मला वाटत नाहीं. त्याच्या दरबारांत तुमच्यासारख्या ढोंग्यांच्या पेक्षां माझी इज्जत खात्रीनें जास्त आहे.

**विद्या०**—धर्मद्रोही चांडाल, धर्मगुरूंचा हा छळ तुला अंतीं रौरव गति दिल्यावाचून रहाणार नाहीं.

**उद्दाम०**—बस. बायकासारखीं बोटें मोडणें बंद करा. तुमच्यासारख्या भेकडांच्या शिव्याशापांनीं या उद्दामकेतूचा एक रोमही वांकडा व्हावयाचा नाहीं. युद्ध अगर सत्याग्रह यांच्यापैकीं एक शर्त मान्य करा. नाहीं तर या शिपायांच्या बरोबर कालदुर्गाचा रस्ता धरा. सेनापति, कालदुर्गावर यांची ताबडतोब रवानगी करा; आणि तक्षक, यांचीं धर्मपीठें जप्त करून सरकारजमा करण्याविषयीं अधिकाऱ्यांना आमचा हुकुम फर्मावा सेनापती, घेऊन चला यांना येथून.

**ज्ञाना०**—अरे सद्ग्रहस्था, आम्हांला विचार करण्याची तरी फुरसत दे. एकदम आमची अशी उचलबांगडी करूं नकोस.

**उद्दाम०**—आपल्याला विचार करण्याला भरपूर फुरसद मिळावी, म्हणूनच आम्ही आपली कालदुर्गावर रवानगी करींत आहोंत. तेव्हां तेथें खुशाल–शांत मनानें–अगदीं मरेपर्यंत विचार करीत बसा. चला सेनापती, घेऊन चला यांना येथून.

**ज्ञाना०**—थांबा–अशी घाई करू नका. उद्दामकेतू, आम्ही तुझी सत्याग्रहाची शर्त मानावयास तयार आहोंत.

**उद्दाम०**—पण तुमच्यासारख्या नादान भेंकडांच्या हातून सत्याग्रह यशस्वी-पणानें पार पडेल, असें आम्हाला आतां वाटत नाहीं. सत्याग्रह हा मर्दांचा मार्ग आहे–नामर्दांचा मार्ग नाहीं, आणि तुमच्या अंगीं मर्दुमकीचा लेशही नाहीं, अशी आमची अनुभवानें बालंबाल खात्री होऊन चुकली आहे.

**योगा०**—आम्हांला–संन्याशांना–धर्मगुरूंना–नामर्द म्हणतोस ? काय म्हणावें तुला ?

**उद्दाम०**—काय वाटेल तें म्हणा–मला त्याची पर्वा नाहीं. तुम्हांला संन्या-सदीक्षा देऊन धर्मसिंहासनांवर कोणत्या गाढवानें बसाविलें, हेंच समजत नाहीं. तुमच्यासारखे विनदाढींचे बोकड धर्मसिंहासनांवर नांदण्यापेक्षां तीं सपशेल ओस पडलीं किंवा पृथ्वीच्या पाठीवरून आजिबात नाहीशीं झालीं तरी मला चालतील–चला–सेनापति, न्या यांना येथून.

**त्रिघे०**—धर्मद्रोह–धर्मद्रोह–धर्मद्रोह ! परमेश्वरा, धर्मरक्षणासाठीं त्वकर धांवून ये–नाहीं सर धर्म रसातळाला गेलाच म्हणून समज. ( सेनापति त्यांना घेऊन जातो ).

**तक्षक**—म्हणजे ? सत्याग्रहाची कल्पना सरकारांनीं सोडून दिली काय ?

**उद्दाम०**—छे–ती अमलांत येईपर्यंत या लफंग्यांना येथून निसटून जातां येऊं नये म्हणून आम्ही अडकवून टाकलें आहे. एवढेंच आतां कांतारांतील सारे चंड-मुंडचामुंड पकडण्याचा हुकुम काढा. त्यांना चांगली तंबी देऊन यांच्याबरोबर सत्याग्रहाच्या मोहिमेवर पाठविण्याची आमची इच्छा आहे.

**तक्षक**—पण या सत्याग्रहाचा कांहीं उपयोग होईल, असे सरकारांना वाटतें काय ?

**उद्दाम०**—फार काहीं होणार नाहीं. पण थोडासा होईल. धर्मानंद

सत्याग्रहाला भिऊन शस्त्रसंन्यास करील, असें मुळींच नाहीं. परंतु संन्याससांप्रदायांत फुट पडून धर्मानंदाचें बळ वाढण्याचें मात्र खात्रीनें थांबेल; आणि त्याची बदनामी करण्याला तें एक चांगलें कारण आपल्याला मिळेल.

**सेवक**—( प्र. करून ) सरकार, सुरेंद्राला आणलें आहे.

**उद्दाम**—आण त्याला आंत. ( सेवक जातो व कैदी सुरेंद्राला घेऊन येतात ). सुरेंद्र, तुझी काय वाट लावावयाची याचा विचार आम्ही कामलतेच्या मर्जीवर सोंपविला होता. परंतु आतां आम्हीच तुला देहान्ताची शिक्षा फर्मावली आहे.

**सुरेंद्र**—ठीक आहे.

**उद्दाम०**—पण एका शर्तीवर तुला प्राणदान देण्याची आमची इच्छा आहे.

**सुरेंद्र**—मला प्राणदानाची जरूरी नाहीं; आणि मी तुमची कोणतीही शर्त मान्य करण्यास तयार नाहीं, हें शरीर आज तुमच्या हातांत सांपडलें आहे व त्याची वाटेल तशी वासलात लावण्याला तुम्ही समर्थ आहांत.

**उद्दाम०**—पण आमची शर्त कांहीं फारशी बिकट नाहीं. कामलतेला आपल्या प्रेमबंधनांतून तूं मुक्त करावेस आणि तिला आमच्याशीं विवाह करण्याची परवानगी द्यावीस, एवढेंच आमचें म्हणणें आहे.

**सुरेंद्र०**—परक्यांच्या हातून स्वदेशाचा घात करविण्याचा संकल्प कामलतेनें ज्या क्षणीं केला, त्याच क्षणापासून ती माझ्या व मी तिच्या प्रेमबंधनांतून मुक्त झालों आहोंत. तेव्हां आतां कोणाचाही हात धरून कोठेंही भटकण्याला तिला माझ्या परवानगीची मुळींच जरूरी नाहीं.

**तक्षक**—सुरेंद्र, तुम्ही आपल्या प्रेमाचा पाश तोडला असला तरी तिनें तो अजून तोडलेला नाहीं. तिचें तुमच्या ठिकाणचें प्रेम अद्यापीही अव्यभिचारी व एकनिष्ठ आहे.

**सुरेंद्र**—हो—असें दिसतें खरें ! नाहीं तर तिनें मला कपटानें युद्धांत पकडून तुमच्या स्वाधीन कां केलें असतें ? आणि आतां तुमच्या हातून मारला जाण्याचा प्रसंग माझ्यावर कां आणला असता ? तेव्हां तिच्या अव्यभिचारी व एकनिष्ठ प्रेमाचें अस्तित्व सिद्ध करण्यासाठीं हा खरोखरच मोठा सबळ पुरावा आहे.

**उद्दाम०**—सुरेंद्र कांहींही असो. पण तुझ्या प्रेमाचें निमित्त पुढें करून ती आमचें प्रेम झिडकारीत आहे. तेव्हां तुझ्या प्रेमाविषयीं तिच्या मनांत नांदत

असलेली आशा समूळ नाहींशी करून आणि आपला हात आमच्या हातांत देण्याचा आग्रहपूर्वक उपदेश करून तिचें मन वळविण्याच्या कामीं आम्हाला मदत करण्याचें तूं वचन देत असलास, तर तुझें देहान्तशासन रद्द करण्यास आम्ही तयार आहोंत.

**सु०**—उद्दामकेतू, सुरेंद्र हा एखादा कुंटण्या आहे अशी का तुझी समजूत आहे ? मूर्खा, आपल्या ठिकाणीं इतकें अचल प्रेम करणाऱ्या स्त्रीला आपल्या हातानें परक्याच्या पर्यंकावर नेऊन बसविण्याला एखाद्या षंढालासुद्धां लाज वाटेल. मग माझ्यासारखा पुरुष असा बेशरमपणा पत्करील, असें तुला वाटलें तरी कसें ?

**तक्षक**—पण यांत कुंटणपणाचा संबंध काय ? ही मध्यस्थी आहे व तुम्ही दोघांनीं एकमेकांचे प्रेमपाश तोडून टाकल्यानंतर अशी मध्यस्थी करण्यांत कोणत्याही प्रकारचा हलकेपणा नाहीं.

**सु०**—चुप बैस मुर्दाडा. आतां यापुढें जीभ जास्त लांबली तर मुळापासून उपटून देईन. याद राख !

**उद्दाम०**—तर मग सुरेंद्र, तुला आपला जिव प्यार नाहीं असें दिसतें !

**सुरेंद्र**—माझा जिव मला कितीही प्यार असला तरी कुंटणागिरीच्या मोबदल्यांत त्याचा सौदा करण्याची माझी इच्छा नाहीं. मी आनंदानें मरेन. पण कामलता तर राहूं दे–पण दुसऱ्या कोणत्याही प्रेमनिष्ठ स्त्रीला परक्याच्या शय्येवर चढण्याला आपल्या हाताचा आधार केव्हांही देणार नाहीं.

**उद्दाम०**—तर मग तुला आतां मरणाच्याच तयारीला लागलें पाहिजे.

**सुरेंद्र**—मरणाची तयारी नामर्दाला करावी लागते. मर्दाला करावी लागत नाहीं. मर्द नेहमीं मरावयाला तयारच असतो.

**उद्दाम०**—ठीक आहे. तक्षक, कांतारछावणीपुढें याची कत्तल उडविण्याचा सेनापतींना संदेश पाठवा. ( पड्यांत–कामलताः—" नाहीं–सुरेंद्रांची कत्तल उडणार नाहीं. " ) सुरेंद्राची कत्तल उडणार नाहीं ! कोण म्हणतें उडणार नाहीं ?

( कामलता प्र० क० ).

**काम०**—मी म्हणतें उडणार नाहीं–ही कामलता म्हणते उडणार नाहीं.

**उद्दाम०**—पण कामलतेला या भानगडींत पडण्याचें कारण काय ?

**काम०**—सुरेंद्र कामलतेचा गुन्हेगार आहे व त्याला शिक्षा सुनावण्याचा अधिकार राजाधिरांनीं कामलतेला दिलेला आहे.

**उद्दाम०**—पूर्वी दिला असेल. परंतु कामलतेनें कांतारसम्राटाच्या तलवारीचा त्याग करून आपली नालायकी शाबीत केल्यामुळें आम्ही तो अधिकार तिच्याकडून काढून आपल्याकडे घेतला आहे व सुरेंद्रास देहान्ताची शिक्षा फर्माविली आहे.

**काम०**—पण मी ती अमलांत आणूं देणार नाहीं. सुरेंद्र जिवंतच राहिले पाहिजेत. व या कामलतेच्या मनगटांत सामर्थ्य असेपर्यंत ते जिवंतच राहतील.

**उद्दाम०**—कामलते, कांतारसम्राटापुढें आपल्या मनगटाच्या सामर्थ्याचा दिमाख मिरविण्याला तुला कांहीं शरम वाटत नाहीं ?

**काम०**—कांतारसम्राटाच्या मनगटापेक्षां माझें मनगट कमकुवत असतें तर मला जरूर शरम वाटली असती. परंतु तें तसें कमकुवत नाहीं अशी माझ्या दिलाची बालंबाल खात्री आहे व ती मी प्रसंग पडल्यास आपणाला प्रत्यक्ष अनुभवानें सिद्ध करून देण्याला तयार आहे.

**उद्दाम०**— कामलते, दिवसानुदिवस तूं अधिकाधिक बेफाम होत चालली आहेस हें चांगलें नाहीं.

**काम०**—माझें स्वातंत्र्य हरण करून मला सर्व बाजूंनीं तुम्ही जखडून टाकूं लागलांत तर तें मी कोठवर सहन करणार ? स्वजनांच्या घातापासून मी परावृत्त झालें हें कांहीं मीं अघोर पाप केलें नाहीं.

**उद्दाम०**—अघोर पापच केलें आहेस. ज्यांनीं तुला धिःकारिलें ते तुझे स्वजन नसून ज्यांनीं तुला आश्रय देऊन तुझ्यासाठीं आपलें सर्वस्व धोक्यांत घातलें तें तुझे स्वजन आहेत आणि त्यांच्याच इच्छेप्रमाणें तूं चाललें पाहिजेस.

**काम०**—नाहीं. मी त्यांना केव्हांहि आपले स्वजन मानणार नाहीं व त्यांच्या हातांत निर्जीव बाहुल्याप्रमाणें खेळणार नाहीं.

**उद्दाम०**—कामलते, तुझी ही जिद्द परिणामीं तुला घातक झाल्याशिवाय राहणार नाहीं.

**काम०**—पण आतां माझा कोणता घात व्हावयाचा राहिला आहे ? माझें स्वातंत्र्य गेलें—माझें वैभव गेलें—माझें सौख्य गेलें ! मी स्वदेशाला मुकलें—स्वजनांना मुकलें—आणि स्वतःचें जें जीवितें तेंही आज माझ्या स्वाधीन राहिलें नाहीं. मग आतां परिणामाची भीति बाळगिण्याचें मला कारण काय ?

**उद्दाम०**—नाहीं. ही तुझी चूक आहे. आमची धि:कारलेली तलवार किंवा आमचा झिडकारलेला हात तूं अजूनही आपल्या हातांत धरशील तर वैभवलक्ष्मी फिरून तुझ्या पायावर लोळण घेत येईल.

**काम०**—नाहीं–आपल्या सैतानी तलवारीला या कामलतेचा प्राणांतींही फिरून स्पर्श होणार नाहीं अथवा आपल्या पावित्र्याचा खून पाडून ही कामलता आपल्या पातकी देहाला प्राणांतींही प्रेमानें कवटाळणार नाहीं. असा अध:पात करून घेण्यापेक्षां—

पद—तुम सब मिलकर मंगल०—

**मरणचि सुखकर जीवन मानी मना ॥ ध्रु० ॥ सत्त्वहीन अधम जना ॥ सौख्य-भोग जरि नाना ॥ अघमलिना प्राणधना ॥ नाशचि परिणामि ॥ १ ॥**

**उद्दाम०**—कामलते, विचार कर. तुझ्या शहाणपणावर आज तुझें एकटीचेंच जीवित अवलंबून नसून सुरेंद्राच्या जीविताची शाश्वतीही त्याच्यावर अवलंबून आहे. तूं आमच्या कोणत्याही म्हणण्याला रुकार दिला नाहींस तर आमच्या तलवारीच्या आणि प्रेमाच्या या कट्ट्या दुस्मानाला अघोर हाल अपेष्टेंत होरपाळून काढून तुझ्या डोळ्यांदेखत त्याचे राईराईएवढे तुकडे करून टाकूं--सोडणार नाहीं.

**काम०**—खुशाल करून टाका. माझी त्याला मुळींच हरकत नाहीं. त्यांच्या या नश्वर देहापेक्षां त्यांच्याविषयींच्या माझ्या प्रेमाच्या पावित्र्याचें मोल शत-पटीनें अधिक आहे आणि देहाच्या रक्षणासाठीं प्रेमाचा खून पाडण्यापेक्षां प्रेमाच्या रक्षणासाठीं शरिराचें बलिदान करणें अधिक श्रेयस्कर आहे.

**उद्दाम०**—ठीक आहे. सुरेंद्र, तुझ्या देशाचा घात करून तुला आमच्या स्वाधीन करणाऱ्या या स्वजनद्रोही राक्षशिणीच्या ढोंगी प्रेमाचें पावित्र्य रक्षण करण्यासाठीं आमच्या तलवारीवर आपल्या प्राणांचा बळी देण्याचा तुझ्याही बुद्धीचा निश्चय झाला आहे काय ?

**सुरेंद्र**--हिच्याच काय पण कोणत्याही प्रेमनिष्ठ स्त्रीच्या पावित्र्याच्या रक्षणासाठीं या सुरेंद्राचे प्राण बळी जाण्याला केव्हांही तयारच आहेत.

**उद्दाम०**—कैरवांचा माथेफिरूपणा तुम्हां दोघांच्याही अंगीं ओतप्रोत भरलेला आहे! पण तुमचा स्वभाव जितका मानी व आग्रही आहे, त्याहून या उद्दामकेतूचा स्वभाव जास्त मानी व जास्त जिद्दखोर आहे. तो आपल्या दुस्मानांच्या हट्टा-

पुढें केव्हांही वांकणार नाही. तो त्यांना आपल्या पायावर वांकवील; नाहींतर आपल्या पायांखालीं तुडवून टाकील. तक्षक, आजपासून आठव्या दिवसाच्या मध्यरात्रींपर्यंत या दोन्ही हक्खोरांनीं आपला हट्ट सोडून, आमच्या इच्छेपुढें आपल्या माना विनशर्त वाकाविल्या नाहींत, तर नवव्या दिवसाचा सूर्य क्षितिजावर येतो न येतो तोंच या दोघांचाही उघड्या मैदानावर शिरच्छेद करवून टाकवा. चला–सुरेंद्राला घेऊन चला येथून— ( सुरेंद्राला नेतात. पडद्यांत " बंड–बंड" असा गलबला होतो ) बंड ? बंड कोणाचें ? तक्षक, पहा काय गडबड आहे ती ( गलबला ).

**सेनापति**—( प्र. करून ) सरकार, राजकन्या चंद्रकला हातांत शांततेचें निशाण घेऊन अनेक सन्मान्य लोकनायकांसह व हजारों लोकांसह छावणच्या महाद्वारावर येऊन उभी आहे व महाराजांच्या भेटीची परवानगी मागत आहे.

**उद्दाम०**—हें काय बंड आहे वाटतें ? बेवकूब–पागल लोक ! 'बंड–बंड' म्हणून ओरडतात ! सेनापति आधीं जा आणि हीं आरोळी एकदम बंद करवा !

**सेना०**—जशी सरकारांची आज्ञा. पण राजकन्येच्या निरोपाला काय उत्तर पाठवूं ?

**उद्दाम०**—आम्ही स्वतःच महाद्वारावर येत आहोंत, असें कळवा तिला ( गलबला ). पण हा कल्ला एकदम बंद करवा. ( सेनापति जातो ). कामलते, आमचे अखेरचे शद्ब लक्षांत ठेव. कांतारसम्राटानें आपला इच्छाभंग आजवर कधीं सहन करून घेतला नाहीं आणि तो यावेळींही करून घेणार नाहीं.

**काम०**—आणि कामलतेनेंही आपली मान जुलमापुढें कधीं वांकविली नाहीं आणि ती या वेळींही वांकाविणार नाहीं.

**उद्दाम०**—ठीक आहे. पाहिलें जाईल. तक्षक, हिला एकदम कैद करवा. आणि आम्ही महाव्दारावर जातो तेथें आमच्या पाठोपाठ येऊन मिळा. (जातो).

**तक्षक**—(टाळी वाजवितो त्याबरोबर सेनापति व शिपायी येतात ). राणीला कैद करा. ( ते तसें करतात ). राणीसाहेब, समर्थांशीं जिद्द करण्या पूर्वी थोडा विचार करावयास पाहिजे.

**काम०**—विचार कसला करावयाचा ? जिद्द करावयाची तर ती समर्थांशींच केली पाहिजे. असमर्थांशीं करण्यांत पराक्रम काय ? तक्षक—

पद्–तोडी–त्रिताल

पडला अघोर घाला ॥ झाला ॥ घात तरि न–या ॥ अधम पशु बला । नमविन भाला ॥ धृ० ॥ परमथोर हा स्वतंत्र बाणा ॥ कालभयें जरि लांछिला ॥ सुवीरता–यश जाई लयाला ॥ मानहानि जनिं कालां सकला ॥१॥ –जातात.–

---

## प्रवेश २ रा.



( कांतारसम्राटाच्या राजवाड्याचें महाद्वार. चंद्रकला, लोकनायक व लोक शांततादेवीचा जय-जयकार करीत राजद्वारासमोर मैदानांत उभे असतां उद्दाम-केतु तक्षकासह प्र.क. )

**उद्दाम**०—लोकनायकहो व लोकहो, आपण एवढ्या मोठ्या जमावानें येथें कशाकरितां जमा झालां आहांत?

**चंद्र**०—हें अमानुष राक्षसी युद्ध एकदम बंद करण्यांत यावें अशी लोकांची इच्छा आहे व ती समक्ष आपल्या कानावर घालावी म्हणून हे लोकनायक व लोक आपल्या भेटीस आले आहेत.

**उद्दाम**०—मला वाटतें आमचा प्रश्न लोकनायकांना व लोकांना होता–तुला नव्हता.

**चंद्र**०—पण लोकनायकांना व लोकांना विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचा अधिकार त्या सर्वांनीं मला दिला आहे.

**उद्दाम**०—तुझ्या मार्फतीनें जर आमचे सवाल जबाब व्हावयाचे असतील तर आम्हाला आल्यापावलीं परत जावें लागेल. लोकनायकहो, आमची इच्छा आपल्याशीं बोलण्याची आहे व आपणच आमच्याशीं बोलाल, अशी आम्हाला उमेद आहे.

**१ लोक**०—नाहीं. आमच्या वतीनें बोलण्याचा अधिकार आम्ही राज-कन्येलां दिलेला आहे.

**२ लोक०**—तीच आपल्याशीं काय बोलावयाचें तें बोलेल.

**३ लोक०**—आम्ही कोणीही तोंडावाटें एक अवाक्षर काढणार नाहीं.

**उद्दाम०**—तर मग आपली मुलाखत खलास झाली म्हणून समजा. येतों आम्ही. ( जाऊं लागतो ).

**चंद्र०**—( अडवून ) नाहीं. महाराजांना लोकांचा असा उपमर्द करून येथून जातां यावयाचें नाहीं.

**उद्दाम०**—लोकांनीं आमचा उपमर्द केल्यावर लोकांचा मान ठेवण्याचें आम्हाला कारण काय ?

**चंद्र०**—लोकांनीं आपला बिलकुल उपमर्द केलेला नाहीं.

**उद्दाम०**—उपमर्द केलेला नाहीं ? आम्ही जिला नादान ठरवून घराबाहेर हाकलून दिलें तिला पुढारीपणाचा मान देणें, हा आमचा उपमर्द नाहीं काय ?

**लोक०**—पण आपणाला जें माणूस प्रिय नाही तें लोकांनाही अप्रियच असलें पाहिजे असें कांहीं शास्त्र आहे कीं काय ?

**उद्दाम०**—हो-हो-असेंच शास्त्र आहे.

**चंद्र०**—आपलें शास्त्र असेल-लोकांचें शास्त्र नाहीं. पसंतीनापसंतीचा जवढा आपल्याला हक्क आहे तेवढा लोकांनाही आहे. आपल्याला मी अप्रिय झालें; आपण मला घराबाहेर हांकलून दिलेंत. लोकांना मी प्रिय झालें; लोकांनीं मला आपली प्रतिनिधि नेमलें. त्यांत त्यानीं गैर काय केलें ?

**उद्दाम०**—कांहीं गैर केलें असो किंवा नसो. आम्हाला तुझ्या मार्फतीनें त्यांच्याशीं बोलावयाचें नाहीं व आम्ही बोलणार नाहीं.

**चंद्र०**—आपल्याला बोलावेंच लागेल व तेंही माझ्या मार्फतीनेंच बोलावें लागेल. मी कांहीं यावेळीं कांतारसम्राटानें घराबाहेर हांकून दिलेली त्यांची नावडती मुलगी म्हणून आपल्यापुढें उभी नाहीं. कांतारलोकनायकांनीं व लोकांनीं एक मतानें निवडून दिलेली त्यांची प्रतिनिधि म्हणून आपल्यापुढें उभी आहे. आपल्या नादान मुलीशीं आपण बोला किंवा बोलूं नका. तो आपल्या मर्जीचा प्रश्न आहे. परंतु लोकांच्या प्रातिनिधीशीं आपल्याला बोललेंच पाहिजे व बोलावेंच लागेल.

**लोक०**—हो-हो-बोललेंच पाहिजे. बोलावेंच लागेल !-

उद्दाम०—बोललेंच पाहिजे ? बोलावेंच लागेल ?–

चंद्र०—हो–हो–बोललेंच पाहिजे.–बोलावेंच लागेल.–मी आपणाला बोलावयास लावीन–सोडणार नाहीं.

उद्दाम०—युद्ध बंद व्हावें अशी लोकांची इच्छा आहे. परंतु आमची तशी इच्छा नाहीं आणि आम्ही तें केव्हांही बंद करणार नाहीं.

चंद्र०—महाराज लोकांच्या इच्छेचा असा अनादर करतील तर त्याचा परिणाम लोकांना व महाराजांना दोघांनाही भोगावा लागेल.

उद्दाम०—परंतु आजच्या परिस्थितींत युद्ध बंद करणें हेंही लोकांना आणि आम्हाला हानिकारकच होणार आहे.

चंद्र०—नाहीं–लोकांना व लोकनायकांना तसें वाटत नाहीं.

उद्दाम०—नसेल वाटत. पण आम्हाला जोंपर्यंत तसें वाटत आहे, तोंपर्यंत युद्ध हें चालू राहिलेंच पाहिजे व ते चालू राहाणारच.

चंद्र०—तर मग लोकमताला पायाखालीं तुडविण्याचा आपला निश्चयच झाला आहे.

उद्दाम०—लोकमत जर मूर्खपणाच्या दिशेनें वाहूं लागलें तर त्याला बाजूस सारणें भागच आहे. मूर्ख लोकमताच्या नादीं लागून कांतारसाम्राज्य आम्हांला कांहीं धुळीला मिळवून घ्यावयाचें नाहीं.

चंद्र०—महाराज, लोकमत मूर्खपणाच्या दिशेनें वहात नसून शहाणपणाच्या दिशेनेंच वहात आहे; आणि त्याला अनुसरून आपण चाललांत तर कांतारसाम्राज्य या भयंकर संकटांतून सहीसलामत बाहेर पडेल. आपल्या लहरीबरोबर अधिकाधिक वहावत जाल तर पराभवाच्या जबरदस्त खडकावर आपटून त्याचे तुकडे तुकडे होतील व त्याला समुद्राच्या तळाशीं कायमची जलसमाधि घ्यावी लागेल.

उद्दाम०—शक्य नाहीं. युद्धांत अखेरीस आमचीच तलवार विजयी होणार याबद्दल आमच्या दिलाची बालंबाल खात्री होऊन चुकली आहे.

चंद्र०—हा आपला भ्रम आहे. दीनदुर्बलांच्या रक्ताकरितां हापापलेल्या आपल्या सैतानी तलवारीला ईश्वराच्या घरीं कांहीं न्याय असेल तर जय येणें केव्हांही शक्य नाहीं. महाराज–

—पद—

**फुकट बल-मद हा सारा । पशुबलासि यश । न परिणामीं खास ॥ ध्रु० ॥ परस्वापहारा असिधारा ॥ रक्तपात करि तरी कुलनाश ॥१॥**

**उद्दाम०**—पण आमची तलवार दीनदुर्बलांच्या रक्ताकारितां हापापलेली आहे हा तुझा आमच्यावरील अरोप अजिबात खोटा आहे. परस्वापहाराच्या दुष्ट लालसेनें हें युध्द आम्ही आरंभिलें नाहीं व चालवीतही नाहीं. प्रबलांच्या स्वार्थाला बळी पडलेल्या शरणागत अनाथांचा दुःखपरिहार करून त्यांचे न्याय्य हक्क त्यांना मिळवून देणें हा कांतारसाम्राज्याचा व कांतारसाम्राज्यसिंहासनाचा आजवरचा बाणा आहे-आजवरचा लौकिक आहे; आणि हा बाणा आणि हा लौकिक कायम राखणें हा कांतार सम्राट या नात्यानें आमचा पवित्र धर्म असल्यामुळें, आम्हाला शरण येऊन कांतार साम्राज्यसिंहासनाचा आश्रय करणाऱ्या अनाथ कामलतेला, तिचें न्यायानें असलेलें कैरव राजसिंहासन परत मिळवून देण्यासाठीं आम्ही हा युद्धयज्ञ आरंभिला आहे-चालविला आहे.

**तक्षक**—सम्राटांनीं असें केले असतें तर दीनरक्षणाच्या कांतारांच्या व्रताला बट्टा लागून कांतारसम्राटाचाच नव्हे तर अखिल कांतारवंशाचा व कांतार साम्राज्याचा जगांत दुर्लौकिक होऊन, त्यांचा जगांत नांदत असलेला दरारा पार धुळीला मिळाला असता व जगाच्या बाजारपेठेंत कवडीमोलानेंही त्यांची इज्जत कोणी जोखली नसती.

**उद्दाम**—चंद्रकले, तूं अजून पोर आहेस. तुला राजकाणांतले गहन प्रश्न अद्यापि नीट कळतसुद्धां नाहींत. राजकारणांत इज्जत व इभ्रत या दोन मोठ्या प्रबल शक्ति आहेत; व राज्यकर्त्यांनीं वाटेल ती किंमत देऊन त्यांचें प्राणापलीकडे जतन केलें पाहिजे. तुझ्या पोरकट मेंदूला भावनाप्रधान कल्पनांनीं ग्रासून टाकल्याबद्दल आम्हाला वाईट वाटलें, तरी आश्चर्य वाटत नाहीं. परंतु या राजनीतिनिपुण व्यवहारपंडितांनीं तुझ्या नादानें वेडगळ कल्पनांना बळी पडून युद्ध बंद करण्याचा आग्रह धरावा, याबद्दल आम्हांला आश्चर्यच नव्हे तर अत्यंत खेदही होतो.

**तक्षक**—खरें पाहिलें असतां यांनीं या वेळीं सम्राटांना कायावाचामनें करून सहाय्य करून आपली व आपल्या साम्राज्याची कीर्ति सांभाळण्याची

शिकस्त करावयास पाहिजे होती. परंतु असें न करितां हें आज सम्राटांच्या मार्गांत नस्तीं विघ्नें उपस्थित करीत आहेत व आपल्या देशाचा, आपल्या राष्ट्राचा व आपल्या जगद्विख्यात साम्राज्याचा आपल्या हातानें नाश करण्यास सिद्ध झाले आहेत. तेव्हां या आत्मघातकी लोकांना काय म्हणावें, हेंच आम्हांला समजत नाहीं !

**चंद्र०**—आपणाला समजत नसेल तर मी आपणाला सांगतें. आपण आतांपर्यंत युद्धाचें जें भपकेदार भडक समर्थन केलेंत त्यांत एक अक्षरही खरें नसून तें अव्वलपासून अखेरपर्यंत असत्यानें ओतप्रोत भरलेलें आहे. आणि कांतारवंश, कांतारसाम्राज्य, कांतारसाम्राज्यसिंहासन यांच्या लौकिकाचा आपण जो मोठा बाऊ केला आहे, त्यांत तर कांहींच अर्थ नाहीं. या युद्धामुळें कांतारांचा लौकिक रतिभरही वाढलेला नसून, उलट सर्वत्र बदलौकिक मात्र झाला आहे. कामलतेसाठीं युध्द आरंभिण्यांत आलें असतांना ती शस्त्रत्याग करून स्वस्थ बसल्यावर हें युद्ध बंद होणें जरूर होतें. परंतु तिनें युद्ध सोडल्याबद्दल तिच्याशीं असहकार करण्यांत आला असून युद्ध अधिक निकरानें चालविलें जात आहे. तेव्हां कामलतेसारख्या अनाथ शरणागताचे न्याय्य हक्क संपादन करून देण्याची भाषा निव्वळ खोटी व मानभावी आहे. खरा हेतु कैरवांना चिरडून टाकून हळुंहळुं दक्षिणेकडील सर्व दुर्बल राष्ट्रांना घशांत टाकणें हा आहे. महाराज, प्रबलांना परमेश्वर सामर्थ्य देतो, तें अनाथ दुर्बलांना भक्षण करण्यासाठीं देत नाहीं—त्यांचें रक्षण करण्यासाठीं देतो. परंतु आज आपण आपल्या सामर्थ्याचा दुर्बल अनाथांच्या नाशाकडे दुरुपयोग करून परमेश्वरी इच्छेचा उपमर्द करीत आहांत. कांतारांना परमेश्वराचा हा उपमर्द मान्य नाहीं व म्हणून त्यांचा युद्ध बंद करण्याबद्दल हा आग्रह आहे. आजपर्यंत झालें तें होऊन गेलें. पण आतां यापुढें तरी सावध होऊन कांतारवंशाचा व कांतारसाम्राज्याचा अधःपातापासून व विनाशापासून बचाव व्हावा अशी त्यांची इच्छा आहे—मागणी आहे—आणि तिला आपण मान द्याल, अशी त्यांना उमेद आहे.

**उद्दाम०**—आम्ही ही मागणी मान्य करण्यास बिलकुल तयार नाहीं. युद्ध हें चालू राहिलेंच पाहिजे व तें चालू रहाणारच.

**चंद्र०**—तर मग लोकांना आपल्याला विरोध करणें प्राप्त होईल.

**उद्दाम०**—लोकांच्या विरोधाची आम्हांला बिलकुल पर्वा नाहीं. मूढपणानें

ते जर आमच्या मार्गांत आडवे आले, तर त्यांना कापून काढून आम्ही आपला रस्ता साफ करून घेऊं–सोडणार नाहीं.

**चंद्र०**—आपल्या तलवारीचें लोकांना भय वाटतें, असें आपण समजूं नका. लोकांना कापून काढण्यासाठीं ज्या दिवशीं आपली तलवार म्यानांतून बाहेर पडेल त्या दिवशीं कांतारांत रक्ताचे पूर वाहून, त्यांत आपल्याही रक्ताचें अखेरचें अर्घ्यप्रदान केलें जाईल, हें खुप समजून असा.

**उद्दाम०**—आमच्या रक्ताचें अर्घ्यप्रदान ?

**चंद्र०**—हो–हो–आपल्या रक्ताचें अर्घ्यप्रदान !

**उद्दाम०**—असेंच असेल तर कांतारसम्राटानें तुमचें हें विरोधाचें आव्हान आतांच स्वीकारलें आहे असें समजा; आणि तुमच्यांत काय असेल नसेल तें बळ गोळा करून कांतारसम्राटाचा मार्ग अडवून धरण्याला तयार व्हा. कांतारसम्राट तुमच्याशीं दोन हात करण्याला तयार आहे. चंद्रकले, तूं भलभलतीं तत्त्वें लोकांना शिकवून कांतारांत यादवीचा वणवा पेटवीत आहेस, हें ठीक नाहीं. तुझ्या धमकीप्रमाणें लोक जर खरोखरच आमच्या मार्गांत आडवे आले, तर त्यांच्या त्या अपराधाबद्दल पहिल्यानें तुझें शिर वेशीवर टांगलें जाईल, लक्षांत ठेव. कांतारसम्राट् राजकारणांत खासगी नातीं ओळखीत नसतो.

**चंद्र०**—आणि चंद्रकलाही परमेश्वरी कार्यांत खासगी नात्यांचा कधींहि वरचष्मा होऊं देत नाहीं. तेव्हां लोकांशीं झुंजण्याची जर आपणाला एवढी उकळीच फुटली असेल तर लोकांच्या वतीनें मी आपणांस आतांच सांगतें कीं लोकांनींही आपल्या या जुलमाच्या आव्हानाचा स्वीकार केला आहे; आणि तेही आपल्या मनगटाशीं मनगट घासून पहाण्यास तयार आहेत.

**उद्दाम०**—तर मग यापुढचे सवाल जबाब सम्राटाच्या जिव्हेने न होतां त्याच्या तलवारीच्याच जिव्हेनें होतील.

**चंद्र०**—महाराज, लोकमताला पायाखालीं तुडवून आपण आज राजधर्माचा भंग करीत आहांत हें ठीक नाहीं. ही लोकांची वंचना आहे–हा लोकांचा विश्वासघात आहे. तो आपल्याला भोंवल्यावांचून रहाणार नाहीं. महाराज–

पद—धिःकार मन साहिना—

**सत्तांध जन–वंचका । नृपति नच गणिति बुध, तस्कराचि तो निका ॥ स्वजन धिःकारिती करिति दुर्लौकिका ॥ ध्रु० ॥ नुरतेचि सुरता । नृपधर्मविमुखा ॥ विनिपात शतधा । त्या हतविवेका ॥१॥**

**उद्दाम०**—बस्-आपली मुलाखत आतां खलास. चला-चालते व्हा.

( सर्व जातात ).

---

## प्रवेश ३ रा.



( रणमैदानाचा मार्ग. धर्मानंदांची यतिसेना रणांगणाकडे जात असतां ज्ञानानंद, विद्यानंद व योगानंद यांनीं आपल्या अनुयायांसह त्यांचा मार्ग अडवून सत्याग्रह केला आहे ).

**सदानंद**--आचार्य, नका--नका-आमचा रणभूमीचा मार्ग रोंखून धरून आमच्या कर्तव्यांत आम्हांला असा निष्कारण अडथळा करूं नका.

**ज्ञानानंद**—कर्तव्यांत अडथळा करूं नका ? कोणत्या कर्तव्यांत अढथळा करूं नका ? हिंसात्मक युद्धकर्मांत सामील होऊन खाटकाप्रमाणें तलवारीनें माणसें कापीत सुटणें, हें तुम्हां यतींचें कर्तव्य आहे काय ?

**सदा०**---पण आम्ही कापीत आहोंत तीं माणसें नसून माणसांच्या रूपानें वावरणारे ते राक्षस आहेत, हें आचार्यांनीं लक्षांत घेतलें पाहिजे.

**विद्या०**—पण राक्षसांना कापून काढण्याचा धंदासुद्धां यतींनीं केला पाहिजे, असें कोणत्या शास्त्रांत सांगितलें आहे ?

**योगा०**---यतींचा धर्म अहिंसा आहे-हिंसा नाहीं; आणि माणूस असो वा राक्षस असो, यतीला कोणाचीही हत्त्या करितां येत नाहीं !

**सदा०**—हिंसाहिंसेचा हा वाद आपण खुद्द आचार्यांशीं करा. आम्ही आचार्यांचे आज्ञांकित सेवक आहोंत व त्यांच्या आज्ञेचें बिनचूक पालन करणें एवढेंच आमचें कर्तव्य आहे. या पलीकडे आम्ही कांहीं जाणत नाहीं. तेव्हां आमच्याशीं निष्कारण हुज्जत घालीत न बसतां कृपा करून आमचा मार्ग मोकळा करून द्या व आम्हाला रणक्षेत्राकडे बिनहरकत-जाऊं द्या.

**योगा०**—ते नांव घेऊं नका. शहाणपणानें शस्त्र खालीं ठेवून एक तर तुम्ही आपल्या मठांचा मार्ग धरा-नाहीं तर आपल्या शस्त्रांनीं आमचीं मस्तकें कापून काढून रणक्षेत्राचा मार्ग आपल्या हातांनीं खुला करून घ्या. आम्ही आपण

होऊन आपल्या मार्गांतून दूर होणार नाहीं व प्राण गेला तरी आपणांस रण-क्षेत्राकडे जाऊं देणार नाहीं.

**विद्या०**—अलबत् जाऊं देणार नाहीं. आम्ही सत्याग्रह आरंभिला आहे. आणि सत्याग्रहांत पलायन अगर शरणागति बिलकुल मान्य नाहीं. एक तर विजय तरी प्राप्त झाला पाहिजे, नाहीं तर मरण तरी आलें पाहिजे.

**ज्ञाना०**—तेव्हां तुमचा शस्त्रसंन्यास अगर आमचा शिरसंन्यास या दोहों-पैकीं कांहीं तरी एक घडून आल्यावांचून हा झगडा मिटणें शक्य नाहीं. ( सत्याग्रहींचा जयजयकार ).

**सदा०**—असाच आपला हट्ट असेल तर शस्त्रसंन्यासाऐवजीं शस्त्रप्रयोगालाच आम्हांला प्रारंभ करावा लागेल.

**ज्ञाना०**—खुशाल करा. सत्य हें सत्य आहे—

**योगा०**—आणि आग्रह हा आग्रह आहे!

**विद्या०**—तेव्हां शस्त्रापुढें सत्याग्रह विरघळून जाईल, असें समजूं नका.

**ज्ञाना०**—एक तर सत्यापुढें शस्त्र गळून पडलें पाहिजे–

**योगा०**—नाहीं तर शस्त्रानें सत्याचा खून पाडला पाहिजे.—

**विद्या०**—त्यावांचून सत्याग्रह व हत्याग्रह यांमधील या वादाचा निकाल लागावयाचा नाहीं.

**सदा०**—तर मग होऊंच द्या आतां सत्य आणि शस्त्र यांच्या बलाची परीक्षा. तुमचें सत्य हें खरें सत्य असेल तर त्याच्यापुढें आमचीं शस्त्रें आपोआपच गळून पडतील. नाहीं तर आमचीं शस्त्रें तुमचा कांटा वाटेंतून दूर करून आमचा मार्ग मोकळा करून घेतील. सैनिकहो, काढा तलवारी आणि सरा पुढें. ( सैनिक तलवारी उपसतात व पुढें सरतात. सत्याग्रही त्यांस अड-विण्यासाठीं त्यांच्या मार्गांत आडवे होतात. झुंज सुरू होणार तोंच कल्पलता प्र. क० ).

**कल्प०**—थांबा–हात आवरा–हत्यार चालवूं नका.

**चिदा०-सदा०**—हात आवरा ? हत्यार चालवूं नका ? कां हात आवरा ? कां हत्यार चालवूं नका ?

**कल्प०**—सदानंद–चिदानंद, निःशस्त्रावर शस्त्रप्रहार करणें हा अधर्म आहे.

**विद्या०**—आणि त्यांतही सत्याग्रही निःशस्त्र संन्याशावर प्रहार करणें आणि तोही संन्याशांनींच करणें म्हणजे तर त्या अघोर पातकाला जगांत सीमाच नाहीं!

**कल्प०**—पण संन्याशांना संन्याशांवर शस्त्रप्रहार करण्याचा प्रसंग आपण कां येऊं देतां ?

**ज्ञाना०**—सत्यासाठीं–केवळ सत्यासाठीं आम्हांला तसें करणें भाग आहे!

**कल्प०**—आचार्य, सत्याच्या नांवाची अशी बदनामी करण्यांत अर्थ काय ? सत्य खरोखरच आपणांला इतकें प्रिय असतें व त्यासाठीं आत्मयज्ञ करण्याचें सामर्थ्य आपल्या ठिकाणीं नांदत असतें तर उद्दामकेतूच्या बडग्याला भिऊन आपण आमच्या मार्गांत विघ्न उपस्थित करण्याच्या पातकाला प्रवृत्त झालाच नसतां ! इतकेंच नव्हे तर उद्दामकेतूविरुद्ध सत्याग्रह करून तुम्ही त्यालाच हें युद्ध बंद करण्यास भाग पाडलें असतें. परंतु तुमचें सत्याचें हें निव्वळ ढोंग आहे; व आपला नामर्दपणा छपविण्यासाठीं तुम्ही तें उभें केलें आहे. तेव्हां कृपा करून सत्याच्या नांवाखालीं असत्याचा फैलाव करून या पवित्र संन्यासवेषाला निष्कारण बट्टा लावूं नका.

**सदा०**—नाहीं तर सत्याच्याच काय, पण महासत्याच्या नांवानें आक्रोश करीत जरी तुम्हीं आमच्या शस्त्रांना अडथळा करूं लागलांत, तरी तुमच्या या असत्य सत्याची व ढोंगी सत्याभिमानाची तीव्रता आपल्या शस्त्रावर कसाला लावून पाहिल्याशिवाय आम्ही राहणार नाहीं, हें पक्कें लक्षांत ठेवा.

**कल्प०**—तेव्हां कृपा करा व मुकाट्यानें आमचा मार्ग मोकळा करा आणि आम्हाला रणक्षेत्राकडे जाऊं द्या.

**ज्ञाना०**—नाहीं. आमचीं प्रेतें पायांखालीं तुडविल्यावांचून तुमच्या पायांचा रणभूमीला कालत्रयीं स्पर्श होणार नाहीं.

**कल्प०**—तर मग सदानंद–चिदानंद, यांना बाजूस सारून रणक्षेत्राचा मार्ग आक्रमण करण्याची सैनिकांना आज्ञा करा. ( सत्याग्रही संन्यासी "धिःकार–धिःकार" म्हणून मोठ्यानें ओरडूं लागतात. इतक्यांत सेनापतीचा वेष धारण केलेला धर्मानंद संन्यासी सैनिकांसह प्र० क० ).

**धर्मा०**—धिःकार ? धिःकार कोणाचा ?

**ज्ञाना०**—सत्याच्या शत्रूंचा !

**योगा०**
**विद्या०** }—अत्याचारी दुरात्म्यांचा !

**सत्या० सं०**—धिःकार ! धिःकार ! ! सत्याच्या शत्रूंचा व अत्याचारी दुरात्म्यांचा धिःकार !

**धर्मा०**—ज्ञानानंद-विद्यानंद-योगानंद, सत्याचे शत्रु व अत्याचारी दुरात्मे कोण ?

**ज्ञाना०**—आपण आणि आपले हे सारे अनुयायी.

**धर्मा०**—काय ? आम्ही आणि आमचे अनुयायी सत्याचे शत्रु व अत्याचारी दुरात्मे ?

**विद्या०**—होय-आपण व आपले अनुयायी सत्याचे शत्रु व अत्याचारी दुरात्मे !

**धर्मा०**—आश्चर्य आहे ! सत्यासाठीं या धर्मरणयज्ञांत आपल्या पंचप्राणांचें बलिदान करण्यास सिद्ध झालेल्या सत्यनिष्ठांना सत्याचे शत्रु व अत्याचारी दुरात्मे म्हणणें आणि तेंही ज्ञानानंद-विद्यानंद-योगानंद, आपणांसारख्या त्रिखंडपंडितांनीं म्हणणें म्हणजे खरोखरच मोठें आश्चर्य आहे !

**ज्ञाना०**—आचार्य, संन्यासदीक्षा घेऊन सर्वसंगपरित्याग केलेल्या संन्याशानें हातांत तलवार धारण करून रणभूमीवर मनुष्यजीवांचा संहार करणें, हा धर्म आहे काय ?

**धर्मा०**—अल्बत्-हा धर्मच आहे. उन्मत्त प्रबलांच्या हल्ल्यापासून अनाथ दुर्बलांचें रक्षण करण्यासाठीं आरंभिण्यांत येणारा संग्राम हा एक परमपवित्र यज्ञ आहे व त्यांत अपरिहार्य किंबहुना अवश्य म्हणून घडणारी हत्या हें त्या यज्ञोनारायणाप्रीत्यर्थ होणारें बलिदान आहे. तेव्हां त्याची अधर्मांत गणना कशी करितां येणार ?

**विद्या०**—पण युद्ध हा धर्म आहे का अधर्म आहे, हा आमचा सवाल नसून तो अहिंसाप्रधान यतिधर्माच्या अनुयायांचा धर्म आहे कीं काय, हा आमचा सवाल आहे.

**धर्मा०**—पण या आपल्या सवालालाही आमचें तेंच उत्तर आहे. यज्ञस्वरूप युद्ध हा धर्म आहे. एवढेंच नव्हे तर तो सन्याशांचाही धर्म आहे. मानवसमाजरूपी विराटपुरुषाच्या शरीरांत धुडगूस घालून त्याचा नाश करूं पहाणाऱ्या दुष्ट दुर्जनरूप रोगजंतूंचा परिहार, मनुष्यहत्त्येस मर्यादेत ठेवून-त्यांतील जीवन-

कलेस धक्का लागूं न देतां, शस्त्रप्रयोगानें करण्याचें कौशल्य फक्त निर्मम, निरपेक्ष व निरहंकार अशा संन्यास वृत्तीच्या पुरुषाच्याच ठिकाणीं आढळून येत असल्यामुळें हा संन्याशांचा–एवढेंच नव्हे तर संन्याशांचाच धर्म आहे, असा आमचा स्पष्ट अभिप्राय आहे; आणि म्हणूनच आम्ही आज या पवित्र युद्धधर्माचा स्वीकार केला आहे.

**ज्ञाना०**—पण आपला हा अभिप्राय आम्हांला बिल्कुल मान्य नाहीं. आपण हा भयंकर अत्याचार मांडला आहे, असें आमचें ठाम मत आहे आणि म्हणून शस्त्रत्याग करून आपण त्यापासून परावृत्त व्हावें असें आमचें आपणाला बजावून सांगणें आहे.

**धर्मा०**—या बजावून सांगण्याचा आतां कांहींच उपयोग नाहीं. आम्ही पूर्ण विचार करूनच या मार्गावर पाऊल टाकलें आहे आणि या देहांत प्राण आहे तोंवर तें मागें घेतलें जाणें शक्य नाहीं.

**विद्या०**—आपल्याला तें मागें घ्यावेंच लागेल. आम्ही व हे सारे संन्यासी आपल्याला शस्त्रत्याग करून रणक्षेत्रावरून परत फिरविण्यासाठींच येथें उपस्थित झालों आहोंत व हा सत्याग्रह मांडिला आहे.

**धर्मा०**—पण तो फुकट आहे. धर्मानंदाच्या शस्त्राखालीं उद्दामकेतु तरीं गतप्राण होऊन पडला पाहिजे; नाहींतर उद्दामकेतूच्या शस्त्रानें धर्मानंदाच्या देहाचे तरी तुकडे तुकडे उडाले पाहिजेत. त्यावांचून धर्मानंदाच्या हातांत खेळणारी तलवार फिरून म्यानांत जाणार नाहीं व धर्मानंदाचें पाऊल रणांगणावरून परत फिरणार नाहीं. आपल्याप्रमाणें माझाही हा सत्याग्रहच आहे !

**विद्या०**—पण आम्ही आपणांस रणांगणाचें दर्शनच घेऊं देणार नाहीं. सत्याग्रह करून आपला मार्ग अडवून धरूं आणि आमच्या सत्याग्रहास मान देऊन आपणास शस्त्रसंन्यास करण्यास भाग पाडूं.

**धर्मा०**—तुमचा सत्याग्रह असता तर त्याला आम्ही अवश्य मान दिला असता व आमच्या हातांतील शस्त्र आपल्या पायांवर वाहून पुनः यतिदंडाचा स्वीकार केला असता. कारण आपल्याप्रमाणें आम्हालाहि सत्य प्रियच आहे. परंतु आपला हा सत्याग्रह नसून असत्याग्रह आहे. उद्दामकेतूच्या सोट्याला भिऊन त्याच्या चिथावणीनें तुम्ही आमच्या मार्गांत हें विघ्न उपस्थित करीत आहांत.

तेव्हां तुमच्या या सत्याग्रहाच्या थोतांडाला भिऊन आम्ही आपल्या अंगिकारिलेल्या सत्यपालनव्रताचा केव्हांही त्याग करणार नाहीं.

**योगा०**—पहा-पहा-चांगला विचार करा. आपल्या या दुराग्रहाच्या पायीं यतिहत्त्येचें अघोर पातक आपल्या माथीं बसेल, याकडे नीट लक्ष असूं द्या.

**धर्मा०**—यतिहत्त्येचेंच काय, पण साक्षात् देवहत्त्येचें पातक जरी आमच्या शिरावर या वेळीं बसलें तरी त्याचीसुद्धां आम्हांला बिलकुल पर्वा वाटत नाहीं.

**विद्या०**—काय ? देवहत्त्येचीसुद्धां आपल्याला पर्वा वाटत नाहीं ?

**धर्मा०**—नाहीं. देवहत्त्येचीसुद्धां आम्हांला पर्वा वाटत नाहीं. दुष्ट दुरात्म्यांना पाठिशीं घालून असत्याचें रक्षण करणारा तो देव कसला ? पापी चांडाल तो ! तेव्हां तो जरी या वेळीं आमचा मार्ग अडवून धरण्यासाठीं आमच्यापुढें उभा राहिला तरी या तलवारीनें त्याचें मस्तक छेदून पाडण्यास देखाल आम्ही क्षणमात्रही मागेंपुढें पहाणार नाहीं.

**योगा०**—तर मग सैतानांत आणि आपल्यांत कांहींच अंतर नाहीं !

**धर्मा०**—खरोखरच नाहीं. तुम्ही सारे सैतान आमच्या अंगाशीं इतके येऊन भिडलां आहांत कीं सैतानापासून दूर होण्यासाठीं आम्हांला आपल्या तलवारीचाच उपयोग करावा लागेल, असें चिन्ह दिसूं लागलें आहे.

**विद्या०**—आम्ही निःशस्त्र आहोंत व आपण सशस्त्र आहांत, ही गोष्ट आपण लक्षांत घेतली पाहिजे.

**धर्मा०**—कशासाठीं ? आपल्या निःशस्त्रपणाचा विचार न करितां तुम्ही जर आमची खोडी करीत आहांत तर तुमची खोड मोडण्यासाठीं आम्हालाही आमच्या सशस्त्रपणाचा विचार करण्याचें कारण काय ? शत्रु सशस्त्र असो वा निःशस्त्र असो ! तो जर आपल्या कार्यसिद्धीच्या मार्गांत अडथळा करूं लागला तर त्याची कींव न करतां त्याला आपल्या मार्गांतून दूर केलाच पाहिजे.

**ज्ञाना०**—तर मग आपल्या मार्गावर आडवे पडून आम्ही तो आतां अडवून धरावा काय ?

**धर्मा०**—तो प्रश्न तुमचा आहे-आमचा नाहीं. तुम्ही आमच्या मार्गांत आडवे आलांत कीं आमच्या पायाखालीं तुडविले जाल एवढें मात्र आम्ही आपल्याला स्पष्ट बजावून ठेवतों.

**विद्या०**—असेंच असेल तर आपल्या विरुद्ध सत्याग्रह करण्यांत तरी अर्थ

काय ? आपल्याला धर्माची चाड नाहीं—सत्याची चाड नाहीं—पुण्याची चाड नाहीं ! आणि देवालासुद्धां धाब्यावर बसविण्यास आपण बेधडक तयार आहांत !

**योगा०**—मग सत्याग्रहानें तुमच्या फत्तरासारख्या अंतःकरणाला द्रव कसा येणार व आमचा सत्याग्रह यशस्वी तरी कसला होणार ?

**धर्मा०**—नाहीं—नाहींच होणार ! सत्यग्रहाचें उसनें अवसान अंगीं आणून आमच्या मार्गावर आडवें पडण्याची तुमची छाती नाहीं. नुसता शब्दांचा संग्राम सुरू आहे तोंवरच तुमचा हा ढोंगी दमदारपणा टिकून आहे. परंतु शब्दयुद्धाची मर्यादा संपून शस्त्रयुद्धास प्रारंभ होतांच तुमचे हातपाय भयानें लटपटूं लागतील ! बडग्याची ज्यांना भीति वाटते, ते कोणाच्याही बडग्यापुढें आपली मान लवविणारच ! तेव्हां आपल्या नादानपणाचा जगांत तमाशा दाखविण्यापेक्षां मुकाट्यानें आमच्या मार्गांतून दूर व्हा आणि आपले प्राण व आपली इज्जत शहाणपणानें सांभाळा. धर्मानंदाचा बडगा उद्दामकेतूच्या बडग्यापेक्षां कमजोर अगर बेहिमती आहे असें समजूं नका.

**ज्ञाना०**—आपल्या अनुयायांप्रमाणेंच आपणही रणोन्मादानें इतके बेफाम बनलां असाल, अशी आम्हांला कल्पना नव्हती ! आणि म्हणून आतांपर्यंत आम्ही नेटानें झगडत होतों.

**धर्मा०**—नामर्दांना ती कल्पना येणें शक्यच नाहीं. ज्ञानानंद, संन्यासवेष धारण करून तुम्ही आज संन्यासधर्माला लांछन लावलें आहे.सत्य हा संन्याशांचा धर्म असतां,त्याला झिडकारून पीठाच्या व वैभवाच्या लालचीनें तुम्ही आज असत्याची कांस धरलेली आहे.तुम्हाला धर्म कळत नाहीं—अधर्म कळत नाहीं. दुःखाला तुम्ही घाबरतां—मृत्युला भितां. खरें पाहिलें तर या धर्मयुद्धात तुम्ही आमच्या पक्षास येऊन मिळावयास पाहिजे होतें. परंतु तुम्ही मुर्दाडपणानें उद्दामकेतूच्याच पक्षास घट्ट धरून बसलांत व त्याच्या धाकदपटशाला भिऊन आमच्या मार्गांत विघ्नें उपस्थित करण्यासाठीं येथें आलांत. कालसत्तेपुढेंही मस्तक नम्र न करणाऱ्या बहाद्दर संन्याशानें यःकश्चित् उद्दामकेतूच्या सत्तेपुढें साष्टांग लोटांगण घालावें याहून शरमेची गोष्ट ती कोणती ? पण जाऊं द्या. तुमच्यासारखे भेकड आमच्या पक्षांत आले नाहींत, हें आम्ही आपलें महद्भाग्य समजतों. नाहीं तर ऐन आणीबाणीच्या वेळीं आमचा विश्वासघात करून तुम्ही आम्हाला खात्रीनें तोंडघशीं पाडिलें असतें. तेव्हां झालें तें ठीकच झालें. पण आतां तरी सावध

व्हा. आम्हाला सहाय्य करण्याची तुम्हाला हिंमत नसेल तर तें करूं नका— आम्हाला त्याची जरूरी नाहीं. पण आमच्या मार्गांत विघ्न उपस्थित करण्याचें तरी पाप माथीं घेऊं नका. तुमचा हा अडथळा दूर करण्यास आम्ही असमर्थ आहोंत, असें समजूं नका. परंतु आमच्या सामर्थ्याची परीक्षा पहाण्यापेक्षां तुम्ही आपलें शहाणपण या प्रसंगीं दाखवाल तर तें उभयपक्षीं हितावह आहे. तुमच्या रक्तानें आपले हात माखून काढण्यांत कांहीं पाप आहे, अशी भीति आम्हाला मुळींच वाटत नाहीं. परंतु आमच्या हातानें तुमचें रक्त सांडण्याचा प्रसंग तुम्ही येऊं न दिला तर आमच्या मनाला विशेष आनंद होईल. तेव्हां सत्वर विचार करून आपला अखेरचा काय तो निश्चय ठरवा. आम्हाला आतां तुमच्याशीं वाद घालीत बसण्यास फुरसत नाहीं. आम्हाला ताबडतोब रणांगणाकडे जाणें भाग आहे व तुम्ही आमच्या मार्गांत आडवे पडलांत तर तुम्हाला पायाखालीं तुडवून आम्ही रणांगणांकडे चालते होऊं—सोडणार नाहीं. (सदानंदास) सदानंद, आमचा इषारा मिळतांच रणांगणाकडे कूच करण्यास सैनिकांना हुकूम द्या. (ज्ञानानंदास) ज्ञानानंद, ठरला तुमचा निश्चय ?

**विद्या०**—प्रश्न मोठा बिकट आहे. तेव्हां त्याचा निर्णय करण्यास आम्हाला भरपूर अवकाश मिळाला पाहिजे.

**धर्मा०**—ठीक आहे. आम्ही आजच्या युद्धाचा निकाल लावून शिबिराकडे परत येईपर्यंत खुशाल विचार करीत बसा. कल्पलते, सदानंद–चिदानंद आणि सैनिकहो, रणमैदानाकडे कूच करण्यास सुरुवात करा. ( सर्व जातात. ) ज्ञानानंद, येतों आम्ही. आम्ही परतून येण्यापूर्वीं तुमचा विचार संपवून निश्चय झाल्यास आम्हास तुम्ही रणांगणावर संदेश कळविलात तरी चालेल.

( जातो ).

**विद्या०**—अरे, वादविवादाच्या गडबडींत हे सारे निघून गेले !

**योगा०**—निघून गेले ! आमचा विचार नक्की होण्यापूर्वींच निघून गेले !

**विद्या०**—पर्वा नाहीं. ते गेले असले तरी आपण आपला विचार चालू ठेवलाच पाहिजे.

**योगा०**—आणि सत्याग्रहास अनुसरून आपलें ठिकाण मजबूत धरून बसलेंच पाहिजे.

**ज्ञाना०**—बरोबर आहे. त्यांनीं सत्याग्रहाला पायाखालीं तुडविलें असलें तरी

सत्याग्रहावर आपला विश्वास किती अढळ आहे, हें आपणास जगाच्या प्रत्ययास आणून दिलेंच पाहिजे. सत्य हें सत्य आहे व आग्रह हा आग्रह आहे !

**योगा०**—होय. आपण येथें त्यांच्या मार्गांत आडवे पडण्यासाठीं आलों होतों. तेव्हां ते निघून गेले असले तरी आडवे पडून आपण आपला सत्याग्रह तडीस नेलाच पाहिजे. ( सत्यग्रहींस ) यतिवीरहो, आपल्या कर्तव्यपालनास तयार व्हा. पडा–आडवे पडा–आणि आपली सत्याग्रहावर किती निस्सीम श्रद्धा आहे, हें सर्व जगाला निर्विवाद सिद्ध करून दाखवा.

**विद्या०**—नाहीं. आपला विचार अद्यापि नक्की झाला नसल्यामुळें आपणाला आडवे पडतां येत नाहीं. आपणांस तूर्त ही सत्याग्रहाची मोहीम अनिश्चित कालपर्यंत तहकूब ठेविली पाहिजे.

**ज्ञाना०**—तर मग सध्यां सत्याग्रह बंद करण्यांत आला आहे असें आम्ही जाहीर करतों व उद्दामकेतूच्या राज्यांत परत न जातां सर्व सत्याग्रही संन्यासी वीरांनीं वाट फुटेल तिकडे निघून जाऊन आपले जीव वांचवावे अशी आम्ही त्यास धर्मपीठाधिपति या नात्यानें धर्माज्ञा करतों.—

( पडदा पडतो ).

**अंक ४ था समाप्त.**

———

# अंक ५ वा.



## प्रवेश १ ला.

( कामलतेला कैदेंत ठेवलेला तंबू. कामलता विचार करीत प्र. क. ).

**काम०**—( स्वगत ) छे ! नाहीं-नाहीं-नाहींच हा सरळ मार्ग आतां कामाचा ! उद्दामकेतूचा वध करून चाललेला हा मनुष्यसंहार बंद पाडावयाचा असेल, तर मला या वेळीं थोडें तरी वांकडें पाऊल टाकलेंच पाहिजे-त्याशिवाय गत्यंतर नाहीं. धर्मानंद उद्दामकेतूला रणांगणावर शेवटीं ठेंचून टाकतील अथवा चंद्रकला त्याचें सारें बल आकर्षण करून त्यापूर्वीच त्याला निर्विष करून टाकील; या गोष्टी खऱ्या असल्या तरी त्या घडून येईपर्यंत आणखी किती काळ लोटेल, आणि तेवढ्या काळांत आणखी किती रक्त सांडलें जाईल, याचा नियम नाहीं. तेव्हां थोड्याशा पापाला भिऊन हा अनर्थ डोळ्यांनीं निमूटपणें पहात बसणें म्हणजे शुद्ध नादानपणा आहे. पापाचीच भीति धरावयाची तर आतांपर्यंत मीं कोणतें पाप करण्यास कचरलें ? स्वजनांचा द्रोह हें लहान कां पाप आहे ? पण तेंही मी केलेंच ना ? आणि शिवाय ज्याच्या प्रेमाच्या पावित्र्यासाठीं मी आज हा हट्ट धरून बसलें आहे, त्याचा प्रत्यक्ष प्राण शत्रूच्या हातांत देऊन मी कांहीं खात्रीनें पुण्य संपादन केलेलें नाहीं-पापच पदरांत बांधून घेतलें आहे. मग स्वार्थासाठीं एवढालीं अघोर पातकें करतांना ज्या मनानें तिळमात्रही कच खाल्ली नाहीं, त्यानें आतांच लोकहिताच्या वेळीं असें मागेंपुढें कां पहावें ? तें कांहीं नाहीं-आतां मनाचा हिय्या केलाच पाहिजे.-

—पद—जिव बावरा०-

**जनताहिता । खल शासिता ॥ अघलांछना । स्वीकारितां ॥**
**नच लेश बाधे। कृति-बंध-बाधा, ॥ स्वार्थ जिवा रिपु मारिता॥१॥**

( भुजंग येतो ).

**भुजंग**—काय ? ताईसाहेबांनीं माझ्या म्हणण्याचा काय विचार केला ? आजचा मुदतीचा हा अखरचा दिवस आहे. हा गला कीं साराच प्रपंच आटो-

पला ! आपल्यासारख्या राजकुलोत्पन्न राज्याधिकारिणी भाग्यवती नवयौवनेचा शेंवट अशा अल्पवयांत व्हावा, हें कांहीं मनाला बरें वाटत नाहीं !

**काम०**—भुजंग. मी पुष्कळ विचार केला. विचाराची अगदीं शिकस्त केली. बुद्धीला तुमचा युक्तिवाद पटल्यासारखा वाटतो. पण अंतःकरण कांहीं बुद्धीच्या मागून जाण्यास अजून तयार होत नाहीं. आपलें ठिकाण मजबूत धरून बसलें आहे. त्याला काय करूं ?

**भु०**—काय करूं म्हणजे ? अहो, मन आंधळें असून बुद्धि डोळस असल्यामुळें मनानें आपलें ठिकाण सोडून बुद्धीच्या मागून पाऊल टाकलेंच पाहिजे. ताईसाहेब, हा शेंवटचा क्षण आहे. या वेळीं गफलत घाली, तर गेलेंच सारें मुसळ केरांत !

**काम०**—सुरेंद्रांचें काय चाललें आहे ?

**भु०**—हें आपल्यासारखें चाललें आहें. बुद्धि सतेज व बलवान; पण मन पिळापिळीत ! बुद्धीचा प्रकाश त्याला सहन होत नाहीं ! खरोखर आपल्या-सारखीं व्यवहारशून्य एककली माणसें मनुष्याच्या वस्तींत रहाण्यास बिलकूल लायक नाहींत. त्यांनीं जंगलांत अगर पर्वताच्या गुहेंतच जाऊन राहिलें पाहिजे.

**काम०**—पण आतां जंगलपर्वतांच्या गोष्टींचा उपयोग काय ? आतां मृत्यूच्या गुहेंत शिरण्याचीच तयारी केली पाहिजे.

**भु०**—नाहीं, मृत्यूच्या गुहेंतून बाहेर पडण्याची तयारी केली पाहिजे. तारु-ण्याला मृत्यु अगदीं वावडा आहे; आणि त्यांतही आपल्यासारख्या सौंदर्यसंपन्न अप्सरेच्या तारुण्याला तर मृत्यूचा वारादेखील लागूं देतां उपयोगी नाहीं. सरकार, आधींच नरजन्म दुर्लभ ! त्यांत नारीजन्म तर त्याहून दुर्लभ ! आणि त्यांतही राज-कुलोत्पन्न सुंदर नारीजन्म तर सर्वांत दुर्लभ ! तेव्हां सुदैवानें हा अलभ्य लाभ आपणाला अनायासें प्राप्त झाला असतांना तारुण्याच्या ऐन उमेदींत त्याचा असा नाश करून घेणें, यासारखें भयंकर पातक नाहीं. हं ! बालपणांत—अगर त्याही पेक्षां म्हातारपणांत असा भ्रष्ट होण्याचा प्रसंग आपल्यावर आला असता, तर मी मुळींच हळहळलों नसतों, एकदां सोडून दहादां—खुशाल आपल्याला मरूं दिलें असतें. परंतु तरुणपणांत हा प्रसंग आपल्यावर येत आहे.—नव्हे, नव्हे—आपण आणीत आहांत, हें पाहून जिवाचें कसें पाणी होतें !

**काम०**—( विचार केल्यासारखें दाखवून ) भुजंग, ओढलें—ओढलें—ओढ-

लेंच आतां मी माझे मन त्याच्या जागेवरून खालीं. चला, काय व्हावयाचें असले तें होवो ! माझ हें बहरास आलेलें नवयौवन मी आतां मातीला मिळवून टाकीत नाहीं. मी त्याचा उपभोग घेणार–अगदीं मनमुराद उपभोग घेणार आणि सुखासाठीं भुकेलेल्या माझ्या मनाची यथेच्छ तृप्ति करून घेणार !

**भुजंग०**—वाहवा–वाहवा ! युध्दनिन्मुख अर्जुनाला युध्दसन्मुख करून साक्षात् श्रीकृष्णानेंही कुरुक्षेत्रावर जें महायश संपादन केलें नाहीं, तें आज या भुजंगानें केलें आहे. खरोखर या वेळीं जर एखादा व्यास हयात असता, तर माझ्या मुखांतून निघालला स्त्रीवशीकरणाची ही श्रीमद्भुजंगगीता जगांत प्रगट करण्याचें अलभ्य भाग्य त्याला लाभलें असतें ! हो–पण ताईसाहेब, आपला हा निश्चय कायम आहे ना ! नाहीं तर क्षणभरानें पुनः पुण्य, पावित्र्य, शील यांचे पोवाड गाण्यास सुरुवात कराल !

**काम०**—छे–आतां पुण्य, पावित्र्य, शील यांच्या स्तुतिस्तोत्रांना मी कायमचा फांटा देऊन टाकला आहे. जीवरक्षण हेंच सर्वांत उत्तम पावित्र्य, उत्कृष्ट पुण्य आणि उदात्त शील, असा माझ्या मनाचा ठाम निश्चय झाला आहे. तो यापुढें कधीं ढळावयाचा नाहीं. भुजंग, जा. आतां या पावलीं कांतारसम्राटाकडे जा आणि त्याला सांगा कीं कामलता आजपासून तुमची आहे आणि तुमचा हात धरून कांतारसाम्राज्यसिंहासनावर सम्राज्ञी या नात्यानें आरूढ होण्याला अत्यंत आनंदानें तयार आहे. जा–सैतानानें माझ्या अंगांत संचार केला आहे तोंवर जा आणि त्यानें उच्चारविलेल्या शब्दांत मला पकडून कायमची जखडून टाका. जा–आतांच्या आतां कांतारसम्राटाकडे जा व हें शुभ वर्तमान त्याच्या कानावर घालून त्याचें मानी अंतःकरण विजयाच्या आनंदानें प्रफुल्लित हाऊं द्या. जा–कामलता त्याला आतां अनन्यशरण आहे.

**भुजंग**—जातों–जातों–हे व्यवहारचतुर मुत्सद्दी सुंदरी, हा तुझा दासानुदास आतां–या क्षणीं कांतारसम्राटांकडे जातो व हें शुभवर्तमान त्यांच्या कानावर घालून त्यांच्याकडून धन्यवाद संपादन करून घेतों. ( जाऊं लागतो. पुनः मागें परतून ) पण हो ! सम्राटांकडे मी जाऊन उभा राहीपर्यंत हा सैतानाचा संचार उतरणार तर नाहीं ना ? नाहीं तर हा सैतान आपली मानगुटी सोडील आणि तो सैतान माझ्या छातीवर बसेल !

**काम०**—नाहीं. भुजंग, या कामलतेचा शब्द ब्रह्मलिखितप्रमाणें अढळ आहे. तो यापुढें कधींही बदलणार नाहीं.

**भुजंग**—हा ! असा हालवून खुंटा बळकट झालेला बरा ! नाहीं तर आपली मृत्यूच्या गुहेकडे रवानगी होण्यापूर्वीं मृत्यूची स्वारी माझ्या गुहेंत येऊन थढकली असती ! करतां काय ? असंगाशीं संग आणि प्राणाशीं गांठ !

**काम०**—पुरे. आतां ही तुमची चपर्टपंजरी नको आहे ! अगोदर सम्राटा-कडे धांवत–पळत–उडत–कसे वाटेल तसे चालते व्हा. येथें उभे राहूं नका.

**भु०**—चाललों–चाललों–अगदीं धांवत–पळत–उडत–उड्या मारीत चाललों. जय भुजंगगीता ! जय भुजंगगीता ! ! जय भुजंगगीता ! ! ! ( जातो ).

**काम०**—( स्व० ) ठरलें खरें. पण शस्त्र नाहीं, तें कसें मिळववायाचें ? पण कांहीं हरकत नाहीं. शस्त्रावांचूनच मी त्याचा प्राण घेईन–सोडणार नाहीं.—

पद—मदांधा जना०

**प्रमत्ता नराधमा ॥ तुडवीन शिरिं ताडुनी । लत्ताप्रहारा ॥ध्रु०॥ दृढ आत्म–बल–भाव ज्या साचा ॥ कर हाचि करवाल जयशालि त्याचा ॥ तलवार वाही वृथा वीरता–गर्व–भारा ॥ १ ॥**

( जाते ).

## प्रवेश २ रा.



( उद्दामकेतूचा तंबू. उद्दामकेतू व भुजंग प्र. क. ).

**उद्दाम०**—भुजंग, तुमच्या मालकिणीला हें सारें शृंगारसाहित्य पसंत पडेल ना ?

**भुजंग**—हो–हो–पसंत पडलेंच पाहिजे. माझी स्वामिनी मोठी रसिक व रंगेल आहे; आणि ती आज आपली तब्यत अगदीं गारीगार करून टाकील, याबद्दल मला बिलकुल शंका नाहीं.

**उद्दाम०**—खरें पाहिलें असतां, लढाईच्या धामधुमींत हे सारे रंगढंग वर्ज्य आहेत. परंतु स्वजनांच्या रक्षाकरितां चटावलेल्या या क्रूर, जंगली वाघिणीला आम्हाला पुनः आमच्या रथाला जुंपावयाचें आहे आणि म्हणून हें कुपथ्य आज आम्हाला करावें लागत आहे.

**भुजंग०**—परंतु हें कुपथ्य परिणामीं सम्राटांना आयुरारोग्यबलदायक झाल्यावाचून खात्रीनें रहाणार नाहीं. कारण माझी स्वामिनी म्हणजे त्रैलोक्य-चिंतामणीची मात्रा आहे. हिच्यावर कोणतेंही कुपथ्य बाधत नाहीं. सारीं कुपथ्यें पथ्येंच !

**उद्दाम०**—तुमची भुजंगवाणी खरी ठरो ! ( तक्षक प्र. क. ).

**तक्षक**—सरकार, सुरेंद्राला आणलें आहे.

**उद्दाम०**—आणा त्याला आंत-( तक्षक जातो ). भुजंग, कामलतेनें सांगितल्याप्रमाणें सुरेंद्राला आतां येथें आणलेलें आहे. तेव्हां आमच्या प्रतिस्पर्ध्याच्या डोळयांसमोर त्याच्या प्रेमलतिकेला आपल्या अंकावर बसवून आजवर त्याच्याविषयीं आमच्या मनांत धुमसत असलेला सूड आज आम्ही त्याच्यावर उगवून घेणार आहोंत-तेव्हां जा-तिला लौकर इकडे घेऊन या- ( भुजंग जातो. तक्षक सुरेंद्रासह प्र. क. ).

**उद्दाम०**—सुरेंद्र, ही आठव्या दिवसाची रात्र असून हिचा मध्यकाल आतां अगदीं नजीक येऊन ठेपला आहे. तेव्हां आतां तुझा निश्चय काय आहे, बोल.

**सुरेंद्र०**—मर्दाचा निश्चय सरड्याच्या रंगाप्रमाणें क्षणोक्षणीं बदलणारा नसतो.

**उद्दाम०**—तर मग कामलतेचा हात आमच्या हातांत देण्याला तूं तयार नाहींस ?

**सुरेंद्र**—बिलकुल तयार नाहीं. उलट तिच्या हातांत हात घालून इहलोकच्या सीमेबाहेर पाऊल टाकण्यास माझें मन अधिक आतुर झालें आहे.

**उद्दाम०**—पण तिनें आपण होऊन आपला हात आपल्या हातांत दिला तर ?

**सुरेंद्र**—परमेश्वर जगांतून ठार झाला, असेंच मी समजेन.

**उद्दाम०**—तर मग सुरेंद्र, परमेश्वराचें प्राणोत्क्रमण होण्याची घटका अगदीं नजीक येऊन ठेपली आहे, हें लौकरच तुझ्या प्रत्ययाला येईल. कामलतेनें आपला हट्ट सोडला असून आम्हाला आपल्या बाहुपाशांनीं गाढ आलिंगन देण्याचें तिनें अभिवचन दिले आहे व ते पूर्ण करण्यासाठीं ती आतांच येथें येणार आहे.

**सु०**—उच्छिष्ट भक्षण करण्याचा आनंद कावळ्याला ! टाकणाराला त्याचें महत्त्व नाहीं-सुखदुःध नाहीं. ( भुजंग व कामलता प्र. क. ).

**उद्दाम०**—ये-कामलते, अशी इकडे ये; व या पर्यंकावर आमच्या शेजारीं

बसून तुझ्याशीं दगलबाजी करणाऱ्या या पाजी हरामखोराचें नाक साफ कापून टाक.

**काम०**—राजाधिराजांनीं मला क्षमा करावी. या प्रसंगाच्या आकस्मिकपणामुळें माझें मन भांबावल्यासारखें झालें आहे. तेव्हां मला क्षणभर येथेंच शांतपणें उभें राहूं द्यावें. मी माझें मन स्थिर करतें व नंतर—

**सुरेंद्र**—त्या मंचकावर आपल्या शेजारीं येऊन बसतें !

**काम०**—होय. सुरेंद्र, आपण माझें अपुरें वाक्य पुरें केलेंत, याबद्दल मी आपली फार आभारी आहे. या पर्यंकावर यांच्या शेजारीं बसण्यासाठींच मी येथें आलें आहे.

**सुरेंद्र**—तर मग आतां वाट कसली पहातेस ? तुझा जार तुझ्या गाढालिंगनासाठीं अगदीं आतुर झाला आहे ! तेव्हां जा—त्याच्या अंकावर बैस. त्याच्या चुंबनानें आपले गाल रंगवून घे; आणि त्या उकिरड्यावर खातेऱ्यांतल्या डुकरीप्रमाणें त्याच्या गळ्यांत गळा घालून मरेपर्यंत लोळत पड. म्हणजे आजवर आचरिलेलीं सर्व पुण्यें एकदम फळाला येऊन तुझ्या या अमोल स्त्री जीविताचें तत्काल सार्थक होईल.

**काम०**—सुरेंद्र, मी दुबळी ठरलें असल्यामुळें तुम्ही बोलाल तें या वेळीं मला ऐकून घेतलेंच पाहिजे !

**सुरेंद्र**—पण एवढी तसदी मी तुला आतां देऊं इच्छित नाहीं. उद्दामकेतूच्याच काय पण कोणत्याही डुकराच्या गळ्यांत जरी तूं जाऊन पडलीस तरी त्याचें सुखदुःख मला सारखेंच आहे.

**काम०**—( स्व० ) येथें कोठें हत्यार दिसत नाहीं, काय करावें ?

**उद्दाम०**—कामलते, सुरेंद्राशीं वादत बसण्यासाठीं का तूं येथें आली आहेस ?

**काम०**—नाहीं. मी आपल्याशीं एकान्त करण्यासाठीं येथें आलें आहे. परंतु पूर्वीचे ऋणानुबंध या वेड्या मनाला एकदम तोडवत नाहींत, त्याला काय करावयाचें ? पण आतां यापुढें यांच्याशीं अधिक कांहीं बोलावयाचें उरलें नसल्यामुळें या पुढचा सारा काळ मी आपल्याशीं प्रेमसंवाद करण्यांतच घालविणार आहें. ( स्व० ) सम्राटाची तलवार कोठें आहे ?

**उद्दाम०**—तर मग ये. अशी या मंचकावर बैस. तुझ्या आलिंगनासाठीं आमचें मन अत्यंत अधीर झालें आहे.

**काम०**—पण महाराज, या सेवकांच्या समोर असे श्रृंगारविलास करण्या-इतकें माझें मन अद्यापीं निःसंग बनलेलें नाहीं. या सर्वांना बाहेर जाण्याची आज्ञा करा. म्हणजे मग मी आपल्या सर्वस्वी आधिन होण्याला तयारच आहें. मलासुद्धां महाराजांच्या गळ्याला कडकडून मिठी केव्हां मारीन असें झालें आहे. ( स्व० ) हां. सम्राटाची तलवार तेथें दिसत आहे-पण ती माझ्या हातांत कशी येणार ?

**उद्दाम०**—तक्षक, भुजंग, सुरेंद्राखेरीज तुम्ही सर्व आतां बाहेर चला.

**सु०**—मला येथें कशासाठीं ठेवतां ? त्यांच्याबरोबर मलाही बाहेर घेऊन चला.

**उद्दाम०**—नाहीं. तुला आजची सारी रात्र येथेंच घालाविली पाहिजे; व आपला दुस्मान आपल्या प्रेमाची कशी विटंबना करतो हें प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहिलें पाहिजे !

**सु०**—उद्दामकेतु, तुझ्या नीचपणाची आतां मात्र अगदीं कमाल झाली ?

**उद्दाम०**—प्रेमांत आणि युद्धांत जसे सर्व प्रकार क्षम्य आहेत, तसेच ते सूडांतही पण क्षम्यच आहेत !

**काम०**—आणि क्षम्य नसले तरी सुरेंद्रांना त्यांत हर्षविषाद वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. त्यांचा माझा प्रेमसंबंध तुटलेला आहे आणि आम्हां उभयतांनाही वाटेल तें करण्याची आतां पूर्ण मुभा आहे.

**सुरेंद्र**—वाटेल तें करण्याची मुभा असली, तरी परस्परांच्या पुढें आपल्या बेशरमपणाचें राजरोस प्रदर्शन मांडण्याची मुभा खास नाहीं.

**काम०**—कां ? कां नाहीं ? करणारांनीं लाज सोडली म्हणजे पहाणारांनींही ती सोडलीच पाहिजे असें कांहीं शास्त्र नाहीं ! तुम्हाला हें प्रदर्शन आवडत नसेल, तर तुम्ही आपले डोळे खुशाल मिटून घ्या !

**उद्दाम०**—आणि ते कायमचे मिटून घेतले तरी त्याला आमची मुळींच हरकत नाहीं.

**काम०**—( स्व० ) हं. आतां असेंच केलें पाहिजे. म्हणजे सम्राटाची तलवार आपल्याला सहज काढून घेतां येईल. ( उघड ) सुरेंद्र, कल्पलतेच्या प्रेमा-साठीं आपण माझी मुंडी मुरगळली आहे. तेव्हां तुमची हरएक प्रकारें विटंबना करून मी आपला सूड आतां तुमच्यावर उगवल्यावांचून रहाणार नाहीं. ही पहा-

ही प्रेममाला मी आतां पाहिल्यानें कांतारसम्राटांच्या गळ्यांत घालतें व या शृंगार-साहित्यानें त्यांचें प्रेमपूजन करतें. पहा-पहा-महाराज,—

पद—फुलबाग तमन्नाकी०—गझल.

**शृंगार-सुर-लता ही ॥ शृंगार-भरा आली ॥**
**शृंगार-सुरा प्याली ॥ शृंगारमया झाली ॥ धृ० ॥**
**शृंगार-मंचकीं या ॥ शृंगार-सुख लुटाया ॥**
**शृंगार-सुमन-माला ॥ प्रियनाथ ! गळां घाली ॥ १ ॥**

**सुरेंद्र**—( संतापून ) नादान अवदसा !

**काम०**—नादान अवदसा ! कोण नादान अवदसा ?

**सु०**—तूं-कामलता-नादान अवदसा !

**काम०**—मी ! मी कामलता नादान अवदसा ! सुरेंद्र, तोंड संभाळून बोल. नाहीं तर-

**सु०**—नाहीं तर काय ?

**काम०**—नाहीं तर काय ? पुनः तोंडांतून गैरजबान निघाली तर जिनें तुला पकडून येथें या खांबाशीं आवळून टाकलें आहे-ती-ती-ती ही कांतारसम्राटाची कालस्वरूपिणी तलवार उद्यांची सकाळ उजाडण्यापूर्वीच तुझें शिर धडापासून अलग करून कैरवांच्याप्रमाणें तुझ्याहीं रक्तानें या कामलतेचे हे हात माखून काढील-सोडणार नाहीं.

**सु०**—कामलते, या तलवारीच्या भयानें सत्याचा उच्चार करणारी ही जिव्हा गळून पडेल, असें समजूं नकोस.-उद्दामकेतूचीच काय पण प्रत्यक्ष काळाची तलवार जरी तूं हातांत धारण केलीस तरी तुझ्यासारख्या नादान अवदसेनें मांडलेल्या या अघोर व्यभिचारकर्माचा माझी जिव्हा कठोर शब्दांनीं धिःकार करण्यास क्षणमात्रही कचरणार नाहीं.

**काम०**—तर मग महाराज, द्या ती तलवार इकडे-याच्या जिव्हेचा प्रभाव मला एकदां पारखून पाहूंच द्या. ( त्याची तलवार घेऊन ) हं-सुरेंद्र, काढ-काढ-आतां काय बेजबाब तुला तोंडांतून काढावयाचे असतील ते खुशाल काढ आणि ही कामलता तुझ्या जिव्हेच्या प्रत्येक सवालाला या तलवारीच्या जिव्हेनें खडखडीत जबाब देते कीं नाहीं, त्याचें प्रत्यंतर पहा, बोल-

**उद्दाम०**—कामलते, क्रोधानें असें मध्येंच उसळल्यानें रतिसौख्याचा भंग होतो !

**काम०**—महाराज, रतिविलासाच्या ऐन रंगांत शत्रूनें अपमानास्पद अपशब्दांचा अकस्मात् प्रहार केल्यावर क्रोध उसळल्यावांचून कसा राहील ? कट्ट्या दुस्मानाचे बेजबाब कानावर येऊन आदळत असतांही शृंगाराचा भंग होऊं न देण्याइतकें माझें मन निर्लज्ज किंवा निगरगट्ट नाहीं. ( सुरेंद्रास ) बोल-सुरेंद्र, बोल. ही पहा--ही कामलता तुझ्या डोळ्यादेखत तुझ्या कट्ट्या शत्रूला आपल्या बाहुपाशांत कवटाळून धरते-पहा-नीट डोळे उघडून-न्याहाळून पहा-

**उद्दाम०**—ये-कामलते, ये; आणि तुझ्या आलिंगनासाठीं आतुर झालेलें हें हृदय आपल्या आशामय स्पर्शानें शांत कर.—

**काम०**—सुरेंद्र, फिरव तोंड इकडे-पहा-पहा-

**उद्दाम०**—सुरेंद्र, पहा-पहा तुझ्या प्रेमाचे धिंडवडे हा तुझा कट्टा दुस्मान कसे उडवीत आहे तें चांगलें डोळें उघडून पहा-( कामलता आलिंगन देण्यासाठीं पुढें झाल्यासारखें करून उद्दामकेतूवर वार करते ). चांडाळणी, काय केलेंस हें ?

**काम०**—प्रेमाच्या पावित्र्याचें रक्षण केलें आणि आतां हें स्वदेशघाताच्या पातकाचें परिमार्जन करतें ! ( दुसरा घाव घालते ).

**उद्दाम०**—खून ! खून ! ! खून ! ! ! ( मरतो ).

**काम०**—चुप, ओरडूं नकोस. ( आणखी घाव घालते ). चल जा. आतां दुनिया तुझ्या जुलुमांतून मुक्त झाली !

**सु०**—कामलते-कामलते, काय-काय केलेंस हें ?

**काम०**—आतांपर्यंतच्या कपटनाटकाचा शेवट केला. सुरेंद्र, ज्या हातानें व ज्या तलवारीनें या कामलतेनें आपल्या बांधवांचें रक्त रणभूमीवर सांडलें, त्याच हातानें व त्याच तलवारीनें उद्दामकेतूच्या रक्तानें मी त्या आपल्या मृतबांधवांचें तर्पण करीन, अशी मी प्रतिज्ञा केली होती; व ती मी आज आपल्या व सर्वसाक्षी परमेश्वराच्या साक्षीनें पूर्ण केली आहे. ( त्याला सोडविते ).

**सु०**—कामलते, तुझा उद्देश न कळल्यामुळें माझ्या तोंडून तुझ्यासंबंधानें कठोर शब्द निघाले, त्याची क्षमा कर.

**काम०**—सुरेंद्र, आतां ही तलवार घ्या आणि आपल्या देशाचा विश्वास-

घात करून त्याच्या रक्तानें आपले हात माखणाऱ्या या अधमाधम राक्षसिणीला आपल्या हातानें देहान्त प्रायश्चित्त देऊन, तिची या जगांतून मुक्तता करा.

**सु०**—कामलते, हा अधिकार माझा नाहीं. शिवाय उद्दामकेतूच्या रक्तानें आपले हे पापी हात तूं धुवून काढले असल्यामुळें देहान्त शासनाला तूं पात्र आहेस किंवा नाहींस, हाही आतां एक मोठा सवालच आहे. ( दचकून ) पावलें कोणाचीं ऐकूं येतात ? ( इतक्यांत चंद्रकला व कांहीं लष्करी अधिकारी गुप्त वेषानें प्र. क. ).

**काम०**—कोण आहे ?

**चंद्र०**—चुप. गडबड करूं नका—नाहींतर नाहक मारले जाल !

**काम०**—मारले जाल ?

**चंद्र०**—होय, मारले जाल. कामलते, उद्दामकेतू महाराज कोठें आहेत ?

**काम०**—कां ? तूं कोण विचारणार ?

**चंद्र०**—मी ? मी चंद्रकला—

**काम०**—चंद्रकला ! आणि चंद्रकलेला अशा अपरात्रीं उद्दामकेतू महाराजांच्या तंबूंत चोरून शिरण्याचें कारण काय ?

**चंद्र०**—कांतारप्रजाजनांच्या व कांतारसेनेच्या हुकमानें सम्राटाला कांतार साम्राज्यसिंहासनावरून खेचून काढून त्याला कैद करण्यासाठीं आम्ही येथें आलों आहोंत.

**काम०**—तर मग कांतारसम्राट तुमच्या हातीं लागणें शक्य नाहीं.

**चंद्र०**—शक्य नाहीं ? कां शक्य नाहीं ?

**काम०**—तो फरारी झाला !

**सर्व**—काय ? फरारी झाला !

**काम०**—होय, फरारी झाला.

**सेना०**—असा कसा फरारी झाला ? तंबूला सर्व बाजूंनीं गराडा दिला असतांना त्याला बाहेर पडण्याला वाट कशी आणि कोठून मिळाली ?

**काम०**—तुम्हीं तंबूबाहेर पडण्याच्या वाटा रोंखल्या होत्या. जगाच्या बाहेर पडण्याची वाट रोंखली नव्हती—ती खुलीच होती.

**चंद्र०**—म्हणजे ?

**काम०**—म्हणजे काय हें या तलवारीवर चमकणारे रक्ताचे बिंदु तुम्हांला बरोबर सांगतील!

**चंद्र०**—रक्ताचे बिंदु बरोबर सांगतील! म्हणजे? कोणाचें रक्त हें?

**काम०**—तुझ्या पित्याचें.

**चंद्र०**—माझ्या पित्याचें!

**काम०**—होय. तुझ्या पित्याचें-कांतारसम्राटाचें-दुनियेच्या दुस्मानाचें!

**चंद्र०**—म्हणजे? माझ्या पित्याचा—

**काम०**—वध झाला-तुझा पिता मारला गेला-

**चंद्र०**—मारला गेला! कोणाकडून मारला गेला?

**काम०**—माझ्याकडून-या कामलतेकडून. चंद्रकले, या कामलतेनें या तलवारीनें त्या सैतानाला कंठस्नान घालून त्याची रौरव नरकांत रवानगी केली आहे. पहा.-तुला खोटें वाटत असेल तर हा पहा.-हा सैतान आपल्याच रक्तानें भरलेल्या या आपल्या मृत्युशय्येवर कालनिद्रा घेत स्वस्थ पडला आहे तो पहा व आपली खात्री करून घे.

**चंद्र०**—हाय हाय! बाबा-बाबा-( उद्दामकेतूच्या प्रेतास कवटाळते ). कामलते-कामलते, केवढें अघोर कर्म केलेंस हें?

**काम०**—अघोर कर्म! चंद्रकले, दीनदुर्बल दुनियेचा अमानुषपणें खून पाडण्यापेक्षां हें कर्म अघोर आहे काय? नाहीं-खास नाहीं. दुर्बलांच्या रक्तापेक्षां दुर्जनांचें रक्त खात्रीनें अधिक मोलाचें नाहीं. नाहीं तर ज्याच्यासाठीं तूं आतां हा शोक आरंभिला आहेस, त्याची दुस्मानी करण्याला तूं स्वतःच त्याच्या पोटीं जन्म घेतला असतांही तयार कां झाली असतीस? बोल.-

**चंद्र०**—तुझा सवाल बरोबर आहे. पण कामलते, दुर्जनांचें रक्त कितीही पापी असलें तरी तें जमिनीवर सांडण्यापेक्षां शरिरांतल्या शरिरांत जळून जाणेंच अधिक चांगलें असतें.

**काम०**—चंद्रकले, नाहीं. ही तुझी चूक आहे. दुर्जनांच्या जीविताचा प्रत्येक क्षण नव्या नव्या अनर्थांना जन्म देत असल्यामुळें त्याचा शक्य तेवढा संक्षेप करणेंच जगाच्या हिताच्या दृष्टीनें श्रेयस्कर असतें. पण जाऊं दे. आतां हा वाद वाढविण्यांत अर्थ नाहीं. मी एकटीनें कांतारसम्राटाचा वध केला आहे आणि त्याचे होतील ते परिणाम भोगण्याला माझी तयारी आहे. तेव्हां तुम्हांला

माझें काय पारिपत्य करावयाचें असेल तें खुशाल करा. माझी बिलकुल हरकत नाहीं. माझ्या देशाच्या नाशाचा बदला घेऊन चालू असलेल्या मनुष्यसंहाराला मी आतां आळा घा तला आहे आणि दीनदुर्बलांच्या राशीस लागलेला समंध कायमचा गाडून टाकून जगाला शांततेचा मार्ग खुला करून दिला आहे. तेव्हां आतां माझें कांहीं झालें तरी मला त्याची बिलकुल पर्वा नाहीं. घ्या–ही तलवार टाकून मी आनंदानें तुमच्या स्वाधीन होत आहें ( तसें करते ).

**चंद्र०**—सेनापती, या दोघांना आपल्या ताब्यांत घ्या. ( सेनापती कामलता व सुरेंद्र यांस कैद करतात ). अरेरे! या लोकोत्तर पुरुषाचा अखेर असा भयंकर अंत झाला आं? दीनदुर्बलांच्या रक्ताकरितां हापापलेल्या उन्मत्त प्रबलांनो, या कांतारसम्राटाच्या उदाहरणानें वेळींच सावध व्हा आणि पतितांचा वाली परमात्मा हें तत्व लक्षांत ठेवून त्यानें दिलेल्या सामर्थ्याचा दुर्बलांच्या नाशाकडे दुरुपयोग करूं नका. नाहींतर—

—पद—हिंडोल–त्रिताल. प्रथम श्रवन–

**हरिल परमेश हा शौर्यमद ॥ मुर्दुनी महा कर्दनकाला ॥ धृ० ॥**
**तुडवुनि क्षणि या ॥ राज्य–वैभवा ॥ करिल ठार कुला ॥ १ ॥**

–जातात. पडदा पडतो.—

---

## प्रवेश ३ रा.



( कैरवांची छावणी—धर्मानंद, कल्पलता, वगैरे ).

**कल्प०**—युद्धाची समाप्ति अशा अकल्पित रीतीनें होईल, असें कोणालाही वाटलें नव्हतें.

**धर्मा०**—परमेश्वरी लीला ती हीच. मनुष्यबुद्धीला अतर्क्य असे चमत्कार घडवून आणतो म्हणूनच परमेश्वराला परमेश्वर म्हणावयाचें ! नाहीं तर त्याच्यांत आणि आपल्यांत अंतर काय ?

**कल्प०**—चंद्रकला, सुरेंद्र आणि कामलता यांना तावडतोब आपल्या स्वाधीन करील, असें आचार्यांना वाटतें ?

**धर्मा०**—तिनें स्वाधीन केलेंच पाहिजे. नाहींतर तहाचें बोलणें होण्यासाठीं युद्ध तहकूबच होणार नाहीं. ( सेवक प्र. क. ).

**सेवक**—कांतारांचे वकील, सेनापति सुरेंद्र व राजकन्या कामलता यांच्यासह आले आहेत.

**कल्प०**—आण त्यांना आंत. ( सेवक जातो व त्यांस घेऊन येतो ).

**वकील**—आचार्यांच्या शर्तीप्रमाणें कांतारसम्राज्ञी चंद्रकला इच्या आज्ञेवरून सेनापति सुरेंद्र आणि राजकन्या कामलता यांना मी आचार्यांच्या स्वाधीन करतों.

**धर्मा०**—सुरेंद्र व कामलते, तुमचें स्वागत असो !

**सुरेंद्र व काम०**—आचार्यांना प्रणाम असो ! ( नमस्कार करतात ).

**धर्मा०**—आतां आम्ही ताबडतोब युद्ध तहकूब करून तहाची वाटाघाट करण्यास तयार आहोंत.

**वकील**—आनंद झाला. मी आतांच सम्राज्ञीला व तिच्या प्रधानमंडळांतील सन्मान्य सभासदांना आचार्यांच्या दर्शनार्थ घेऊन येतों.

**धर्मा०**—त्यांच्या भेटीनें आम्हालाही संतोष होईल.

**वकील**—आचार्यांचा व राणीचा विजय असो ! ( जातो ).

**धर्मा०**—सदानंद, तहाच्या वाटाघाटीसाठीं युद्ध तहकूब ठेवण्यांत आलें आहे, अशी द्वाही फिरवा.

**सदा०**—जशी आचार्यांची आज्ञा. ( जातो ).

**धर्मा०**—कल्पलते, तूं चंद्रकलेला सामोरी जाऊन तिचें प्रेमादरपूर्वक स्वागत कर. आम्ही आपल्या शिबिरांत तुम्हां सर्वांची मार्गप्रतीक्षा करितों. ( कामलतेस ) कामलते, तुला कृतकर्माचा पश्चात्ताप झाला, हें पाहून आम्हाला समाधान वाटतें.

**काम०**—हें आचार्यांचें औदार्य आहे !

**धर्मा०**—पतितांचा उद्धारकर्ता परमेश्वर तुझाही उद्धार करील. येतों आतां आम्ही. ( जातो ).

**कल्प०**—ताई, स्वजनांच्या रक्तानें माखलेले तुझे हात उद्दामकेतूच्या रक्तानें धुवून निघाल्यामुळें आतां स्वच्छ झाले आहेत.

**काम०**—परंतु कल्पलते, कैरवांच्या न्यायासनाचा निर्णय लागेपर्यंत मी ते स्वच्छ झाले आहेत, असें समजत नाहीं.

**कल्प०**--ठीक आहे. मर्जी तुझी! परंतु तुझ्या पायांवर मस्तक ठेवण्यास तर मला कांहीं प्रत्यवाय नाहीं? ( तिला नमस्कार करते ).

**काम०**--पण तुला आशीर्वाद देण्याची तरी पात्रता माझ्या आंगीं कोठें आहे? तेव्हां तुझा हा नमस्कार मी ईश्वरार्पण करतें; तोच तुला आशीर्वाद देईल.

**कल्प०**--आतां मी चंद्रकलेच्या स्वागताच्या तयारीसाठीं जातें. तुम्ही उभयतां येथें माझ्या शिबिरांतच विश्रांति घ्या. ( जाते ).

**काम०**—सुरेंद्र,—

**सुरेंद्र**—काय ?

**काम०**—माझ्या सूचनेचा आपण काय विचार केलात ?

**सुरेंद्र**—कांहींच केला नाहीं.

**काम०**—कांहींच केला नाहीं ! कां ?

**सुरेंद्र**—एकदां निर्णय लागल्यावर पुनः विचार करण्याचें कारण काय ?

**काम०**—पण लागलेला निर्णय चुकीचा ठरल्यावर त्याचा फिरून विचार करावयास नको काय ?

**सुरेंद्र**—कामलते, या हाताला कोणाचा प्रेमस्पर्श व्हावयाचाच असेल तर तो फक्त तुझाच होईल; इतरांचा होणार नाहीं.

**काम०**—सुरेंद्र, राष्ट्रघातकी पापिणीचा विषारी स्पर्श आपल्या धवल यशाला क्षणांत जाळून भस्म करील, हें आपणास कळत नाहीं काय ?

**सुरेंद्र**—कळतें. पण कामलते, तुझ्या पातकी स्पर्शानें जळून खाक होण्याइतकें माझें यश दुर्बल असेल तर त्याचा लोभ धरण्यांत हंशील काय? पातक्यांच्या पापाचा भार शिरावर घेऊन ज्याला पातक्यासह भवसागर तरून पार होतां येत नाहीं, त्या पामरानें जगांत जिवंत तरी कां रहावें ?

**काम०**—सुरेंद्र, माझ्या पापांचा भार शिरावर घेऊन माझा उद्धार करण्याची हिंमत ज्या मनाला धरतां येते त्यानें कल्पलतेच्या दुःखाचा भार हरण करण्याचें साहस करण्यास असें कां कचरावें? आपण ज्याच्यावर प्रेम करतों त्याचे ज्याप्रमाणें आपण देणेदार असतों, त्याचप्रमाणें जे आपल्यावर प्रेम करतात, त्यांचेही आपण देणेदार असतों व त्यांचें देणेंही आपल्याला द्यावें लागतें. तें चुकवितां येत नाहीं. सुरेंद्र,–

पद्—भैरवी, त्रिताल. पुष्य जीवा०

प्रेम-सेवा-जीवनिं रंगला । प्रेमभरें महानंदिं दंगला ॥ धृ० ॥
ताडितां पदीं, झिडकारितां ॥ जीव भोळा छळें ठार मारितां ॥
सदाचार साचा वृथा भंगिला ॥१॥

सुरेंद्र—पण कामलते, दुर्दैवानें तें देणें देण्याला आज मी समर्थ नाहीं.

काम०—समर्थ नाहीं ? कां समर्थ नाहीं ?

सुरेंद्र—कामलते, कल्पलतेसंबंधानें माझ्या अंतःकरणांत स्त्रीप्रेमाची भावना कधीं नव्हती, आजही नाहीं आणि पुढेंही कधीं कालीं उद्भवेल, अशी मला आशा वाटत नाहीं.

काम०—सुरेंद्र, हे दुबळेपणाचे शब्द आपल्यासारख्या बहादर वीर-पुरुषाला शोभत नाहींत. ज्या नादान स्त्रीला आपल्या पायाच्या नखाचीही सर येणार नाहीं तिच्यावरील प्रेम जर आपण हट्टानें कायम ठेवूं शकतां, तर जिच्या थोरवीला आज जगांत सीमा नाहीं तिच्यासंबंधानें प्रेमभाव बाळगिण्याचें जर आपण मनांत आणाल, तर तें आपणाला शक्य होणार नाहीं, ही गोष्टच माझ्या मनाला पटत नाहीं.

सुरेंद्र—पण एवढा उपद्व्याप मी कां करावा ?

काम०—कर्तव्यासाठीं. आपल्यावर प्रेम करणाऱ्या जीवांना आपण नितांत दुःखी करावें, हा आपल्या मनाचा हलकेपणा–नव्हे–नव्हे–दुष्टपणा आहे. प्रेमाचे गुलाम सारेच आहेत. पण जो प्रेमाला आपले गुलाम बनवून आपण म्हणूं त्या ठिकाणीं त्याला राबवूं शकतो, तोच खरा बहाद्दर–तोच खरा वीर–तोच खरा पुरुष !

सुरेंद्र—कामलते, मला वाटतें तूर्त हा विषय येथेंच सोडणें चांगलें. या वेळीं माझें मन स्थिर नाहीं आणि मला या विषयाची चर्चा करवत नाही. (कल्पलता येते).

कल्प०—आणि आतां आपल्याला या विषयाची अधिक चर्चा करण्याचें कारणही नाहीं.

काम०—कां ?

कल्प०—ताई, तूं दुःखांत असतांना, मीं सुखी होणें कसें शक्य आहे ?

काम०—कल्पलते, मला माझ्या कर्माचें फळ भोगलेंच पाहिजे. तेव्हां माझ्यासाठीं तूं आपल्या सुखावर असा निखारा ठेवण्यास तयार कां व्हावेंस, हें मला समजत नाहीं.

कल्प०—आणि हें मलाही पण समजत नाहीं. परंतु माझा निर्धार मात्र केव्हांही ढळाणार नाहीं.—मी तो केव्हांही ढळूं देणार नाहीं!

काम०—तर मग आपणा सर्वांनाच संसारसुखाची आशा सोडली पाहिजे.

सुरेंद्र—परमेश्वराची तरी इच्छा अशीच दिसते खरी!

कल्प०—आणि म्हणून त्याच्याच इच्छेवर साऱ्या गोष्टी सोंपवून आपण आपल्या उद्योगाला लागणें चांगलें.

काम०—जशी तुझी मर्जी! तूर्त मला स्वस्थच बसलें पाहिजे.

कल्प०—सुरेंद्र, चला. आपण आचार्यांकडे थोडा वेळ जाऊन येऊं. (जातात).

काम०—अरेरे! याचा शेवट अखेर हा असा व्हावा आं!—

पद—निराधार जीवें०—

सुखाभास ठरला सारा। भवाचा पसारा ॥ ध्रु० ॥ शृंगारा आनंदलहरिचा। विश्वरंगणीं रंग नवा आला ॥ पितां निराशा—महाविषाचा ॥ प्याला, निशाकाळ झाला या संसारा ॥ प्रेमा न थारा विहारा ॥ १ ॥

—जाते.—

---

## प्रवेश ४ था.



[ कैरवांची छावणी—धर्मानंद, चंद्रकला, कामलता, कल्पलता, सुरेंद्र संन्यासी इत्यादि ]

धर्मा०—सन्मान्य सभासदहो, कैरव व कांतार यांच्यामध्यें तह झाला असल्यामुळें आजपासून धर्मयुद्ध समाप्त झालें आहे, असें आम्ही जाहीर करितों. ( जयजयकार ).

काम०—लोकनिर्णयाच्या तत्वाला मान देऊन राणी कल्पलतेची सत्ता मी मोठ्या आनंदानें मान्य करितें.

सुरेंद्र—कैरव न्यायसिंहासनानें कामलतेच्या अपराधांची क्षमा केली आहे. असें मी जाहीर करितों.

कल्प०—लोकनिर्णयाच्या तत्वाचा कैरवांत पूर्ण विकास व्हावा, म्हणून त्यास घालण्यांत आलेली राजकुलो [illegible] मर्यादा मी आज काढून टाकलेली आहे.

**चंद्र०**--जगांतील दुर्बलांच्या माथीं जबरदस्तीनें मारण्यांत आलेली प्रबलांची गुलामगिरी यापुढें जगांतून समूळ नष्ट व्हावी, म्हणून कांतारसाम्राज्यांतील सर्व राष्ट्रांना स्वातंत्र्य बहाल करण्यांत आलें असल्याचें कांतारसम्राज्ञी या नात्यानें मी जाहीर करतें. ( जयजयकार ).

**धर्मा०**—धर्मयुद्धाची समाप्ति होऊन सर्वत्र शांतता प्रस्थापित झाली असल्या-मुळें धर्मरक्षणासाठीं धारण केलेल्या या तलवारीचा संन्यास करून आम्ही आपला धर्मदंड पूर्ववत् धारण करितों व आनंद खंडातील यतिवृंदालाही शस्त्रसंन्यास करण्याची आज्ञा करितों. ( जयजयकार ).

**संन्यासी**—आचार्यांच्या आज्ञेप्रमाणें आम्ही शस्त्रसंन्यास करून आपल्या यतिदंडांचा पूर्ववत् स्वीकार करितों. ( तसें करतात ).

**धर्मा०**—सभासदहो, आतां आपणां सर्वांना परमश्रेष्ठ धर्मासिंहासनाची अशी धर्माज्ञा आहे कीं दुर्बलांचा संहार हा प्रबलांचा धर्म नसून त्यांचा उद्धार हा त्यांचा धर्म आहे, हें सदैव लक्षांत बाळगून परस्परांनीं परस्परांशीं बंधुत्वाच्या नात्यानें, समतेनें व ममतेनें वागावें आणि जगांतील परस्वापहारी युद्धें बंद पाडून शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित करावी.

**सर्व**—ही धर्माज्ञा सर्वांस शिरसामान्य आहे.

**धर्मा०**—परमेश्वर तुम्हां सर्वांचें परममंगल करो !

( धर्मानंदाचा जयजयकार ).

**सर्व**—हे दीनदयाळ परमेश्वरा--

पद–शिवहृदय भुवनेश्वरी०—

**जगिं वितरि सुखशांतता ॥ होवो । अखिल जनता । सुनय विनता ॥ वारि प्रबल छलका ॥ तारि अबल जन ॥ धृ० ॥ कारि त्वरित शांत । रणिं करुनि रक्तपाता । प्राणघाता ॥ नित करि थोर घोर आक्रांता ॥ महाकाल कर जो । लोकनाशकर ॥ १ ॥**

—पडदा पडतो.—

**अंक पांचवा समाप्त.**

**ॐ तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु !**